# नवभारत

जुलै - २०१५



* ऋग्वेदातील 'रसा'- नदी
* मराठीच्या अध्यापनाची विचारसूत्रे
* 'माऊली' आणि 'भातुकली'
* गो. म. कुलकर्णी यांनी केलेली नाट्यसमीक्षा

पुस्तकपरीक्षण :

* ग्रामीण बोलीचा शब्दकोश
* वाचकांचा पत्रव्यवहार



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६८। अंक १०। जुलै २०१५
अधिक आषाढ/ निज आषाढ शके १९३७
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ३०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## जुलै २०१५

## अनुक्रमणिका

# ऋग्वेदातील ‘रसा’- नदी

मो. गो. धडफळे

ऋग्वेदात सिन्धु व सरस्वती यांच्यानंतर प्रामुख्याने उल्लेखिली जाणारी नदी म्हणजे ‘रसा!’ श्रेष्ठ नदी (नदीतमा) असा तिचा उल्लेख ऋग्वेदातील पाचव्या मंडलातील एकेचाळिसाव्या सूक्तातील पंधराव्या ऋचेत येतो. ऋग्वेदातील पणी (फोनेशियन–व्यापारी) देवशुनी सरमेला विचारतात, “कथं रसायाः अतरः पयांसि?” (तू रसानदीचे पाणी ओलांडून कशी आलीस?)

सामान्यतः वायव्यसरहद्द प्रान्ताच्या टोकाशी असलेल्या जलप्रवाहाला ‘रसा’ नदी म्हणून ओळखले जाते. हिचे तादात्म्य अवेस्तात उल्लेखिलेल्या ‘रंहा’ नदीशी सांगितले जाते. ऋग्वेदीय ‘स’ वर्ण हा अवेस्तात ‘ह’ रूपात येतो. जसे सोम – ‘हओम’, सप्तसिन्धवः. अवेस्ताच्या वेन्दिदादमधील ‘हप्तहिन्दवो’ तसेच रसा चे रूपान्तर ‘रघा’ असे व्हायला हवे होते, पण अवेस्तातील वर्णविकृतीनुसार ते रंहा (रंघा) असे झाले आहे. हा ‘अम्’ चा आगम हे अवेस्ताचे आणखी एक वर्णवैशिष्ट्य आहे. जसे मास चे ‘मांह’, मांहे गाहे मराठीतील ‘महीना’ – आंग्ल ‘month’ (चान्द्रमास). ओ. पी. भारद्वाज यांच्या मताने हीच रसा – रंहा. म्हणजेच बलुचिस्थानमधील ‘रक्षान’ नामक नदी. मतांतरे अनेक आहेत. त्यां सर्वांचा परामर्श घेऊन व भौगोलिक स्थिती लक्षात घेऊन मलाही भारद्वाज यांचे रसा – रंहा – रक्षान हे समीकरणच स्वीकारार्ह वाटते.

(१) मॅक्डोनल व कीथ यांच्या वेदिक इन्डेक्स (खंड. २. पृ. २०९) प्रमाणे रसा म्हणजे Arexes किंवा Jaxartes.

(२) एम. एल. भार्गव. (The Geography of Rigvedic India. Lucknow 1964 .P.P. 44. 47.) रसा ह्या नदीचे समीकरण दोन नद्यांच्या संगत-प्रवाहाबरोबर करतात. त्यातील एक तंगिर Tangir ही वायव्यसरहद्दीतून वाहणाऱ्या सिन्धुनदीच्या पात्रात गिलगिट व काबूल (कुभा) ह्या नद्यांच्या दरम्यान मिसळते, तर दुसरी ‘सह्बी’ जी रोहन रोहटक या प्रान्तात वाहणारी नदी तिला जाऊन भिडते.

ही रसा नदी म्हणजेच दूरवरील इराक राष्ट्रातील ताइग्रीस Tigris (The Aryan Trait in Iran and India by Narendranath Ghose, Calcutta. 1937 p. 194.) किंवा मध्यभारतातील नर्मदा (David Frawley, “Gods, sages and kings.” Delhi 1993 P. 857) अशी ऐतिहासिक दृष्ट्या असंभवनीय मतेही मांडली गेली आहेत. ही समीकरणे मांडणारे विद्वान लब्धप्रतिष्ठ असल्याने मला एकच संभाव्यता डोळ्यांसमोर येते की, ‘रसा’ ह्या नदीचे नावच असे आहे की, कोणत्याही जलप्रवाहाला ते लागू पडावे. भगवद्गीता म्हणते, “रसोऽहमप्सु कौन्तेय”. पाण्याचे ‘सार किंवा गोडी’ (Sap or flavour of waters.).

कोणत्याही निश्चित निर्णायक पुराव्याच्या अभावी रसेची वर सांगितलेली विविध समीकरणे असिद्धावस्थेतच राहतात.

यासाठी रसेचा शोध चालूच ठेवायला हवा.

वर सांगितल्याप्रमाणे प्रस्तुतच्या लेखकाचे मत ओ. पी. भारद्वाज यांच्या मताकडे झुकणारे आहे. थोडक्यात रसा म्हणजे बलुचिस्थानातील साम्प्रतची रक्षान. तिचा उगम शिरझा (Shirza) येथे होतो व तिची अखेर पर्शिया (इराण) मधील मश्केल (Mashkel) जवळ होते. तिचा मधला प्रवास मक्रान शिअहावर पर्वत-रांगातून, पंजगुर (Panjgur) पार करून आणि पश्चिमी मार्गाने प्रवाहित होऊन सुमारे २५८ मैलांच्या धावत्या प्रवाहानंतर अखेरी हमुन-इ-मश्केलला जाऊन मिळते.

याबाबतचे बहुतेक भौगोलिक पुरावे रसा ही आधुनिक रक्षान् आहे, या निर्णयाकडेच आपल्याला घेऊन जातात. रसाच्या नेमक्या समीकरणाची गुरुकिल्ली ऋग्वेदातील पणि व अंगिरस (Phonesians and Angels) यांच्या वादात आढळते. (ऋग्वेद १०, १०८ व १.६२.३.,

अनुक्रमणिका

१.२४.६ इत्यादी.) 'नवग्वाः' ही अंगीरसांचीच एक उपशाखा होती. देवशुनी सरमा, इन्द्राची दूती बनून "देवांच्या पळवलेल्या गाई परत द्या" असे खडसावायला रसा नदी पार करून जाते. रसा प्रथम तिला पार करून देत नव्हती; पण तिच्या निर्धारापुढे अखेर रसा नमली व सुतरणीय झाली. रसा नदी पार करणे सोपे नव्हते. पणी तर आश्चर्यचकित होऊन तिला विचारतात, "कथं रसायाः अंतरः पयांमि?" कुत्र्यांच्या जातीत निसर्गतःच दोन शक्ती असतात. गन्धानुरोधाने माग काढणे व दूरवर पाण्यातून पोहत जाणे. पणी हे व्यापारी वृत्तीचे होते. साम, दाम, दण्ड, भेद या चतुर्विध नीती त्यांना अवगत होत्या. ते तिला आपुलकीने 'भगिनी' म्हणून संबोधतात, नंतर देवांच्या गायी वाटून घेण्याचा साम-दाम उपाय अवलंबतात. "अथ ते गवां, सुभगे, भजाम 'दाम" व अखेरीस दण्डाची भीतीही घालतात. "उत अस्माकमायुधा सन्ति तिग्मा" (आमची हत्यारे ही तीक्ष्ण आहेत.). पण तडफदार व इमानदार सरमा पणींच्या कोणत्याच नीतीला बधत नाही. ती ठामपणे सांगते, "नाहं वेद भ्रातृत्वं नो स्वसृत्वं, इन्द्रो विदुरंगिरसश्च घोराः।" अखेर सरमेचे दौत्य सफल होते.

काही वैदिक अभ्यासकांनी पणींच्या ऐतिहासिकते-विषयी संशय व्यक्त करून सरमापणिसंवादसूक्त ही एक मिथ्यकथा असल्याचे म्हटले आहे. (ऋग्वेद १०.१०८.) या संदर्भात अबेल बेर्गेन्य यांचे (Abel Bergaigne. Vol. II. P. 239 Cited by Hellebrandt Vol. i. p. 233. Jan Gondo. A. History of Indian Literature Vol. i. Wiesbaden 1975 P. 97 and Dor is Shrinivasan "The Myth of Pan is in the Rgred. Journal of American Griental society. Vol. 93. No. 1. Jan-March. 1973 PP. 44-58") हे संशोधन-लेखन पहावे. मला मात्र ही कथा पणी ही जमात ऐतिहासिक असल्याचे दर्शवते. 'पण' म्हणजे मूल्य 'आ-पण' म्हणजे 'बाजार.' पणितनः म्हणजे 'मूल्य देऊन खरेदी-विक्री करणारे व्यापारी.' "पणः अस्य अस्तीति पणिन्। पणितनः अपत्यं पुमान् पाणिनिः।" पाणिनि हा पणी (Phunecian होता.)

असे दिसते की, एके काळी दास, दस्यू व पारावत यांच्याचप्रमाणे पणी ही व्यापारी जमात सरस्वती नदीच्या पलीकडील 'विनशन' किंवा 'कलिबंगत' येथे निवास करत असावी. यातच राजस्थान आणि बहवलपूर यांचाही समावेश असावा. या परिसरातून त्यांना हटवून दूर जाण्यास भाग पाडले असावे. ऋग्वेद ६.६१.२ मध्ये सरस्वती नदीने पणींना फस्त केले व पारावतांचे भक्षण केले (६.६१.२.) असे वर्णन आहे.

सरमा-पणि-संवादसूक्ताच्या भाष्यामध्ये सायणाचार्य 'रसा' याचा 'शब्दायगाना' असा अर्थ करतात व तो अंतरिक्षातील जलप्रवाह आहे, पार्थिव नदी नव्हे, हे जेव्हा सांगतात, तेव्हा आश्चर्य वाटते. "रसा नदीचे पाणी तरून तू कशी आलीस?" या पणीच्या प्रश्नाला उत्तर देताना सरमा म्हणते, "मी उडी मारून पैलतीरावर जाईन या भीतीने रसेने तिचे पात्र संकुचित केले."

पणींबरोबरच दस्यू व दास यांची हकालपट्टीही ऋग्वेदात सांगण्यात आली आहे. (ऋग्वेद खिलपर्व. ३. १६. ५. परान्कृणुष्व दासान्।)

अखेर पणी, पारावत, दास, दस्यू या आर्यांच्या शत्रूंच्या रेट्यामुळे सरस्वतीनदी-परिसर सोडून त्यांना सिंधमध्ये वसाहत करावी लागली. हे ऐतिहासिक सत्य सिंधमधील पर्व (र्ब) तीय (पहाडी) अशा जमातींच्या नावांवरून आणि पणींचे रिन्द (Rind), आगरिअ, गर्धई, सरङ्गी अशा अंगिरसांच्या प्रभेदांमुळे सिद्ध होते. पण बिचाऱ्या पणींनाही अंगिरा या बृहस्पतीच्या पुत्राच्या नेतृत्वाखालील अंगिरसांनी सिंधमधूनही बाहेर हाकलले. अंगिरा या नेत्याला आश्वलायन गृह्यसूत्रात आवाहन करण्यात आले. (यासाठी वाचा– डॉ. ज. रा. जोशी यांचा प्रबंध Minor Vedic Deities. पुणे. १९७८. पृ. ४०. 'नेरु' हा अपपाठ बहुधा मूळ 'मेरु' चा असावा. याखेरीज जैमिनीय गृह्यसूत्र. २. ९ हेही पहावे.) अंगिरा या नेत्याला. सिन्धुदेशाधिपती म्हणून या आकरग्रन्थात संबोधले गेले आहे. या सिन्धुदेशाधिपतीने इन्द्र व ब्रह्मा यांसह मरुभूमी (वाळवंटी प्रदेश) चहूबाजूने वेढला. सातत्याने पणींचा पिच्छा पुरवीत अंगीरसांनी त्यांना बलुचिस्थानापर्यन्त जाण्यास भाग पाडले. या सर्वाला कारण ठरले पणींची गाई लुटण्याची सवय व अंगीरसांच्या धर्मकृत्यांत अडचणी आणण्याचे अंमलात येणारे धोरण.

आजमितीस हेच पणी बलुचिस्थानात पठाण म्हणून वावरत आहेत. भगवान् पाणिनींच्या नंतर कैक शतकांनी वैदिक 'पक्थिनः' (पठाण) आजमितीस मुस्लिम झाले आहेत. जसे मुळातील इराणी (पर्शियन) आर्य हे झरथुष्ट्री धर्माचे होते; पण इराणवर मुस्लिमांनी कब्जा मिळविल्यावर अनेकांना सक्तीने मुस्लिम होणे भाग पाडण्यात आले. ज्यांना हा धर्मांतराचा जाच नको होता त्यांनी स्वदेश सोडून भारतात गुजराथमध्ये आश्रय घेतला. हेच ते भारतीय पार्शी.

एकूण सांगायचे झाले तर पठाणांचा नेमका उदगम सांगणे पुरेशा पुराव्याअभावी अवघड झाले आहे. (पहा. Sir Thomas Hungerford Holdich. "India", Reprint, New Delhi, 1975. p. 54.)

मूळ पठाण हे भारतीय वंशाचे होते असे मला नेहमीच वाटत आले आहे. वेदसाहित्यातील "पक्थिनः" म्हणजे पठाण (वाचा. "Punjab Castes", p. 62.). Bellew यांच्या मताने सुलेमान पर्वत-रांगांतील टोळ्या हे भारतीय वंशाचे आदिवासी होते. या उपलब्धीने मला विशेष आनंद अशासाठी झाला की, 'सरहद्द-गांधी' म्हणून ओळखले जाणारे अफगाणिस्थानातील खान अब्दुल गफार खान हे भारतीय वंशाचे वैदिक होते याचा. नव्याने गवसलेल्या वंशावळ्यांनुसार (काळ उणापुरा ४ ते ५ शतकांपूर्वीचा) पठाण-पणी अब्दुल रशिद कइज् या पूर्वजापासून, मध्यम वंशपुरुष घुरघुश्त (Ghurghust) व दमाइ (Damai) यांच्या द्वारा आजचे मुस्लिमधर्मीय अफगाणी पठाण झाले आहेत. (पहा. Denzil Ibbetson's "A Glossary of the Tribes and Casters of the Punjab and the North-West frontier Province. Vol - III. L-Z. Reprint, Patiala 1970.") या पणींबरोबरच मुसा खेल, ककर पणी, सिबीचे पणी हे बलुचिस्थानात येऊन दाखल झाले. बलु (ली) च यांपासूनच बाल्क (क्ख) हा शब्द निष्पन्न झाला असावा. (Imperial Gazetteer of India. Oxford. 1908. p. 289; Punjab Castps. p. 92; A comparative Grammar of Sanskrit, Greek and Hittite, Calcutta, 1968. p. 217.)

बलुचिस्थानात या पणींबरोबरच सिन्धु-नदीच्या पलीकडील वस्तीतून उलमझाइही डेरेदाखल झाले. आजचे अफगाण नेते करझाई नावाचेच आहेत. मूळ डेरा इस्माइल-खानचे आणि मुझरफ गढचे मिहिरा इनन्स (मिथ्रिनः, मैत्रिणः?). त्यांच्या नावावरूनच हे स्पष्ट होते की ते मिहिर (मिथ्र-मित्र) दरीप्रदेशातील होते. नंतरच्या वैदिक साहित्यात मिहिरिनऐवजी सरस्वती हे सिंधमधील नदीचे नाव येते. हीच ती अवेस्तातील इराणमधील 'हरखवैती'. या मिहिरिनचे (सरस्वतीचे) राजस्थानीत नाव आहे 'हकरा', तर बहवलपुरात 'वहिन्द'. हीच हरयानामधील 'घग्गर' (संस्कृत गर्गरा). पंजाब व हिमाचलप्रदेशात सरस्वतीलाच घग्गर म्हणतात. खरे तर पठाणांचे सर्व अन्तर्गत भेद एकमेकांशी संलग्न आहेत, पण त्यांचे वसाहतीचे नेमके स्थान अजूनही दुग्ध्यातच आहे. डेन्झिल इब्बेटसन् (A Glossary of the Tribes .... etc. p. 56) हाही या पणी-पठाणांच्या नेमक्या वसाहतीच्या स्थानाबाबत प्रांजळपणे आपली अनिश्चितता व्यक्त करतो.

बलुचि-पठाण हे केवळ ऋग्वेदातील पणींच्या नावापुरताच संबंध दाखवतात असे नाही, तर इतरही अनेक बाबींमध्ये (traits) त्यांचे निश्चित साम्य आहे. आता धर्माने मुस्लिम झाले असले तरी त्यांना कुराणातील इस्लामच्या मूळ धारणा, रीतीरिवाज यांच्याविषयी काहीच विशेष ज्ञान नाही. Punjab Tribes p. 43 वरील माहितीनुसार पणी हे श्रद्धाहीन, मूढ होते. (foolish and faithless.) पूजा व यज्ञांविषयी त्यांना कोणतीही श्रद्धा नव्हती.

पणी हे द्रव्यलोभी असल्याने ऋग्वेदात (८. ६६. १०) त्यांना 'कद्रू', 'बेकनाट', द्रष्टुत्वहीन (unseers) म्हटले गेले आहे. सायणाचार्य 'बेकनाट' या काहीशा दुर्बोध शब्दाचा अर्थ "अनेन कुसीरिनो, वृद्धिजीविनो, वार्धुषिका उच्यते। थोडक्यात ते आळशी-ऐदी, व्याजावर उपजीविका करणारे", असा सांगतात. सायणाचार्य पुढे म्हणतात, "कथं तद्-व्युत्पत्तिः ? बे इति अपभ्रंशो द्विशब्दार्थे। एकं कार्षापणं गृहीत्वा द्वौ मह्यं दातव्यौ इति लुब्धको अयष्टा।" लोभी, त्याग न करणारा, दामदुप्पट व्याज घेणारा. परवापरवापर्यन्त पठाणी व्याजाचा बडगा हिंदुस्थानात प्रसिद्ध होता. "तौ द्विशब्देन नाटयन्ति (नाडतात)

इति बेकनाटा:"।

पठाणांमधील विशेषकरून बिन्नी शेख हे उत्साही, कामसू व सावकारी करून बऱ्याच व्याजाने रक्कम कर्जाऊ देत असत. या बेसुमार व्याजदराला पठाणी सूद अशी संज्ञा आहे. (पहा Gazatteer of Bannu district of Calcutta. 1883-84. 1. 70.)

पर्णींकडे गायी व घोडे मुबलक प्रमाणात असतात. (अयं सरमे अद्रिबुध्नो गोभिरश्वेभि क्सुभिन्यृष्टः ऋग्वेद १०. १०७. ७ अब.). स्तेन (चोर) व अघशंस (दुष्ट बदला घेणारे) ही विशेषणे पणींना वापरण्यात आली आहेत. (ऋग्वेद. ६. २८. ७ व डॉ. राहुरकर "Seers in the Rgved." p. 105. note. 113.). बलुचिस्थानात उत्तम जातीचे (आ-जन्य) घोडे पैदा व्हायचे व बलुची व अफगाण उत्तम घोडेस्वार होते. ओसामा बिन लादेन हा अश्वारोहणात तरबेज होता. डोंगरांच्या निमुळत्या घळींमध्ये अश्व हेच वाहन योग्य ठरते. (पहा. IGI. Vol. VI. P. 298 and Punjab Castes, P. 42.) "Panjab Castes" मध्ये (पृ. ४२ व ७८) त्यांना निष्णात लुटारू म्हटले आहे. ते खानदानी परंपरागत लुटारू होते. (Imperial Gazetteer. PS. NWFP. p. 42, येथे एका समजुतीनुसार God will not favour a Baloch who does not steal and rob.) भारत व अफगाणिस्थान-बलुचिस्थान वर ब्रिटिशांनी ताबा मिळेपर्यन्त ही परिस्थिती होती.

Holdish. (India. Reprint. New Delhi. 1975. p. 33.) लिहितात:

There would be a descent of the Baloch clansman into Sind or the Pathans of the Suleman hills in the nearest plains, and the general lifting of cattle and goods ensued which call for reprisal and vengence." त्या काळी पशुधन व इतर मालमत्ता चोरण्यासाठी बलुची टोळ्या सिंधमध्ये यायच्या व पठाणी टोळ्या सुलेमान डोंगराळ प्रदेशातून मैदानी प्रदेशात यायच्या. याचे कौतुकही व्हायचे व बदलाही घेतला जायचा.

पणी आळशी होते; तर पठाणांची अशी समजूत होती की, श्रम-उद्योग करणे हे कमीपणाचे होते. एक संकुचित स्वरूपाची घमेंड त्यांच्यात होती. अंगमेहनत म्हणजे मजुरीही ते हलकी समजायचे. ऋग्वेद ७. ६. ३ मध्ये पणींना अस्पष्ट, अधरअधर व विसंगत बोलणारे (म्लेच्छवाचः) व कद्रू म्हटले आहे. त्याचप्रमाणे बित्तन्नी पठाणांना उद्धट, उद्दाम, रासवट असे म्हटले आहे. ते उष्मवर्णांचा (aspirates) वापर असा काही खुबीने करायचे की, पुश्तु भाषा बोलणाऱ्यांना त्यामुळे 'झंडू फुटल्यागत' व्हायचे. ऋग्वेद या पणींचे चातुर्याचे बोलणे 'पणेर्मनीषा' (ऋग्वेद ६१. ३. ५८, २.) या शब्दसंहतीने करतो. आपल्याला या वाक्चातुर्याचा अनुभव सरमापणि संवादसूक्तातच येतो. मर्वतचे बिटन्नोदेखील त्यांच्या कावेबाज चातुर्यासाठी प्रसिद्ध होते. (पहा. "Punjab Castes." १. ७८; Bannu Gazetteer. P. 70.) ऋग्वेदात, ६. ५१. १४ (ड) मध्ये पणींची तुलना लबाड, ढोंगी लांडग्यांशी केली आहे (वृको यः). पणी हे जात्याच लबाड, गोडबोले, कद्रू व मैत्रीचे नाटक करणारे म्हणून ओळखले जात होते. सरमेला ते 'सुभगा', स्वसा (बहीण) असे संबोधून आपल्याकडे वळवून घेण्याचा प्रयत्न करत होते.

मर्वतचे बिटान्नी ह्यांना "Punjab Castes." P. 78 मध्ये Jackal of Waziri. (वझीरी कोल्हा) म्हटले गेले आहे. (Bellew. 9. 177.).

पणी हे उत्तम पाळत ठेवणारे संरक्षक होते. देवांच्या पळवून आणलेल्या गाई त्यांनी गुहांमधून लपवून, गुहांवर दगडांचो दारे बसवली.

पणींप्रमाणेच बलुचिस्थानातील डोंगराळ प्रदेशातील पठाण हे बंदिस्त गुहांमध्ये राहत. टेहेळणीसाठी त्यांनी टेहेळणी-मनोरे (Watch-towers) बांधले होते. पुढे हीच बंदिस्त शहरांची बांधणी दस्यूंनीही स्वीकारली. त्यांच्या तटबंदीचा विध्वंस करणारा इन्द्र हा आर्यांचा नेता 'पुरन्दर' म्हणून ओळखला जाऊ लागला. वैदिक काळात दस्यूंच्या तटबंदी या दगडी होत्या. बुद्धाच्या काळात पाटलीपुत्र (Greek : Palibothra.) हे लाकडी तटबंदीचे बनविण्यात आले.

खराखुरा बलुचि पठाण हा वृत्तीने भटका असल्याने कधीच आपल्या स्त्रियांना वाऱ्यावर सोडत नसे. स्त्रियांना सन्मान मिळाला तर त्यांना कमालीचा मत्सर वाटायचा. (वाचा. "Panjab Castes" P. 42.)









पठाण व पर्णीमधील साम्य पठाण हे ऋग्वेदीय पर्णीचे वंशज असल्याचे निदर्शनास आणून देते. त्यांनी प्रथम सरस्वती नदीच्या दऱ्यांत वसत्या केल्या. या स्थितीला पुराव्याने बळकटी प्राप्त होते. कारण पश्तो, पक्थो किंवा बलुची ही या समाजाची भाषा आर्य भारतीय वंशाची आहे. (Bulier. P. 27; IGI. Vol. vi. P. 288.). आणि ए. डी. पुसाळकर व सुनीती कुमार चटर्जी यांच्या मताने 'पश्तु' (पहा "The Cultural Heritage of India." Vol. I. reprint Calcutta.1970. P.147.) शब्दसंग्रह व व्याकरणरचना या दोन्ही दृष्टींनी ती संस्कृतची एक बोली (उपभाषा dilect) आहे.

पश्तु भाषेवर अवेस्ता, अरबी व पर्शियन भाषांचा प्रभाव असला तरी त्यातील अनेकानेक शब्द हे संस्कृत व प्राकृतांगी संबद्ध आहेत. (Glossary P.205, also gives views or Trumpp and Geiger, Also Edward Balfour "Encyclopaedia Asiatica" Vol. XVIII. P. 783.)

वल (वलासुर अथवा बलासुर), बृसय आणि बृबु हे पर्णीचे प्रतिनिधित्व करणारे होते. (Sarmah. P. 204) ऋग्वेदात बृहस्पति व इन्द्र यांच्याशी वलाचा संघर्ष झाल्याचे अनेक संदर्भ आढळतात. वल हा दूरवर गोमतीनदीच्या काठावर वस्ती करून राहत होता. गोमल ही दूरवर बलुचिस्थानच्या उत्तरसीमेवरून प्रवाहित होते. ( V.I .Vol. I. P. 238) पञ्चविंश ब्राह्मणात (१९.७.१.) वलाने पाणिनेता म्हणून पळवलेल्या गायी रसेजवळ लपवल्याचा निर्देश येतो. (जैमिनीय ब्राह्मण २.४४०.) इन्द्र त्यांची पर्वतीय वसतिस्थाने उद्ध्वस्त करतो व अंगीरसांच्या सांगण्यावरून वलाचा संहार करतो. (मैत्रायणी संहिता ४.१२.५,१२५.) यामुळेच इन्द्राला 'बलभिद' ही किताबत प्राप्त होते. नंतर महाभारतात. (गो. के. भट) "Vedic Themes." Delhi. 1979. P. 65) इन्द्राला 'वलहन्' असेही म्हटले आहे.

सायणाचार्यांच्याही नंतर लिहिल्या गेलेल्या ह्या द्विवेद-लिखित नीतिमञ्जरीमध्ये (सीताराम जयराम जोशी संपादित बनारस. १९३३) वलाला असुर म्हटले आहे. त्याने पळविलेल्या व रसानदीच्या गुहा-परिसरात लपवून ठेवलेल्या गायींना इन्द्राने व बृहस्पतीने सोडविल्याचा उल्लेख आहे. येथे बृबुला सुतार (तक्षन्) म्हटले आहे. तो पर्णीचा सुतारकामे करणारा चाण्डाल होता. टॉलेमी (Ptolemy) बोलेदि नावाच्या वंशाचा उल्लेख करतो. यांचे खरे नाव बेल्यु (Bellew) च्या मताने बोल असे होते. हे बोल नावही असिरियन भाषेतील बएल (Bael), बेल (Bel) किंवा बाल (Bal) या शब्दांवरून निष्पन्न झाले आहे. हे Bal 'बल' म्हणजे ऋग्वेदीय 'वल' असावे, असा माझा कयास आहे. Holdich (कित्ता. पृ. ५२) याच्या मताने वल > बल – बलुचि + स्थान बलुचिस्थान. बुलेधि (Bule dhis) यांनी १८ व्या शतकापर्यन्त मकरानवर अधिराज्य गाजवले. (Dames. P. 511) सिंधमधील अभीर पुढाऱ्यांनी (हे तालपूर किंवा तालबूर जमातीतील होते) तालबुरांच्या लेधारी घराण्याशी संबंध ठेवले त्याचप्रमाणे बुलो (Bulo) ह्यांचा नातू तालबूर याच्याशीही सम्बन्ध जोडला. (Dames. P. 60).

'अवदानकल्पलते' त बालोक्ष असा 'आ'कारादी उल्लेख आढळतो तर बोधिसत्त्वा व कल्पलतेत 'अ'कारादी बलोक्ष असे नाव आढळते. ("The Geographival Dictionary of Ancvient and Mediaeval India." 3rd ed.New Delhi 1971. P. 20. यामुळे ऋग्वेदातील बोलोदि व वल यांचा सम्बन्ध अशक्य वाटू नये.

बृसयची जनताही सरस्वतीच्या पुरात नष्ट झाली असावी. त्यांचेही नशीब पणी, दास व पारावतांसारखेच निघाले. सरस्वतीने पर्णीचे जे हाल केले (या सरस्वती शश्वन्तयाचखादावसं पणिं ता ते दात्राणि तविषा, सरस्वती।. ऋग्वेद. ६.६१.१.) (पारावतमघ्नीमवसे सुवृक्तिभिः सरस्वतीमा विवासेत धीमिभिः। ६.६१.२. सरस्वती देवनिदो नि बर्हय प्रजां विश्वस्य बृसवस्य मायिनः। ऋ. ६.१.२ कऊ). हिलेब्रान्ट (Hillebrandt P. 3966.) ही सर्व नावे वायव्यसरहद्द प्रांतातील असावीत असे मानतो तर Bellow (P. P. 36 & 44.) याच्या मताने काही दहि/ दहल (फू) टोळ्या या अपर्नोइ (Aparnoi) किंवा पर्नोइ (Parnoi) या नावाने ओळखल्या जात होत्या.

हिलेब्रान्टच्या मते स्ट्रॅबो (Strabo) पणींचा उल्लेख (Parnians) पर्निअन, दासांचा दहए, पारावत म्हणजे परोयतई (Paroyatai) तर बृसरा म्हणजे बर्सएन्टस् (Barsaent) चे लोक असा करतो. हेच टॉलेमीच्या मते





अनुक्रमणिका

अर्कोसिआ (Arcosia) चे स(क्ष)त्रप आणि ते अर्कोसिआच्या दिवोदासाबरोबर राहत होते, असेही म्हणतो. अर्कोसिआ हा मुलूख हरखती (Haraxvaiti) म्हणजेच सरस्वतीच्या तीरावरचा प्रदेश. पण हे मत कीथ व नेलमॅक्डो (Vedic Index. Vol. I. P. P. 471- 473) मान्य करीत नाहीत. तसेच Haraxvaiti व सरस्वती एकाच नदीची संस्कृत व इराणी नावे होती, हेही अनेकांना पटले नाही. वैदिक सरस्वतीच्या समीकरणासाठी आपल्याला ओ. पी. भारद्वाज यांच्या "Ancient Kuruksetra", New Delhi.1991 या पुस्तकाची २२ ते २४ पाने वाचायला हवीत. तथापि पणि, दास पारावत या बृसय देशाच्या प्रजेला वायव्य सरहद्द प्रांताचा आश्रय घ्यावा लागला. कारण रसा/रक्सान दऱ्याखोऱ्यांतून त्यांना हुसकावून लावण्यात आले, हे ऐतिहासिक वास्तव असावे. ऋग्वेदात (१०.१०८.१०-११) येथे सरमा पणींना रसाप्रदेश सोडून जा अशी धमकावणी देते, तर हीच बाब आपल्याला वाजसनेयिसंहिता ३५.१ येथे आढळते. बादशहा बाबरच्या कारकिर्दीत संगम दरीत पणींना मुक्त संचार प्राप्त झाला होता. (Oliver P.59) आणि इसवी सन ६ सप्टेंबर १७७५ रोजी पणींचा म्होरक्या दाउदखान पणी धारातीर्थी पडला. ("The Kingdom of Afganisthan : A Historical Sketch". Reprint Delhi 1973. P. 30.) नंतरच्या तिमुइ (Timui) काळातही पणींनी आपला फौजफाटा साम्राज्यवाद्यांना देण्यास साफ नकार दिला. आणि पेशावरच्या राजसिंहासनावर जो विराजमान (सन १८२९) झाला होता, त्याचा थोरला भाऊ मिर्झा पीर मुहम्मद याला लुटल्यावरच अफगाणिस्थानातील हेल्मंड नदीच्या पलीकडील आपल्या मूळ डोंगराळ प्रदेशात ते माघारी परतले. (Hillebrandt Vol. I. P. 472 note 20 quoting "Darmesteter, Chants Popular ives des Afghans. P. clxxi.")

एकूण सांगायचे तर ऋग्वेदातील पणी व त्यासारख्या टोळ्या यांना स्वारस्य होते ते बलुचिस्थान, अफगाणिस्थान आणि त्याहीपलीकडच्या प्रदेशात वास्तव्य करून राहण्याचे.

Bellew या पंडिताचा मला अभिमान अशासाठी वाटतो (पृ. १८८) की, त्यांनी असे विधान केले आहे की, अफगाणिस्थानात भारतीय संस्कृती व भाषा यांचे अवशेष सुरक्षित जतन करून ठेवण्यात आले आहेत. यामुळे अरियाना (Ariana) चे स्पष्ट प्रतिबिंब अफगाणी शब्दात आढळते. या अरियाना-आरियाणीचेच पुढे हरियाणा असे रूप झाले असावे. विशेषत: जमाती व टोळ्यांची नावे जशीच्या तशी तर काही ठिकाणी किंचित उच्चारभेदांसकट आपल्याला अफगाणिस्थानात आढळतात. अङ्गीरसांनी पणींचा एवढा पाठपुरावा केला, की त्यामुळे एकाच प्रदेशात पुष्कळ काळ एकत्र राहून त्यांच्यात सरमिसळ (Intermingling) झाली नसली तरच नवल म्हणायचे

Bellew यांनी दिलेले एक उदाहरण घेतो. भारतात आजमितीस नगरपालिका ('क' हा प्रत्यय आहे) हा शब्द (Muncipality) किंवा (corporation) या अर्थाने वापरला जातो तर अफगाणिस्थानात आजही या नगरपालिकेला 'शहर-वाली' म्हणण्यात येते. शहर म्हणजे मूळ क्षथ्र किंवा क्षेत्र. अर्थ 'शासन'. 'व' व 'प' हे वर्ण एकमेकांच्या जागी वापरले जातात. अवमान-अपमान, कवि-कपि (एक खोडसाळ श्लेषही "विद्वत्कवय:" कवय:, केवलकवयस्तु केवलं कपय:। कुलजा या सा जाया, केवलजाया तु केवला माया" ।।)

Rind ही बलुचींच्या तीन टोळ्यांमधील एक प्रमुख टोळी आणि Bellew च्या मताने ही टोळी मूळची भारतीय होती. भारतीय कच्छी समाजात (काठेवाड-तैत्तिरीय संहितेची 'कठ' शाखा.) एक 'इन्द्र' असे वंशनाम आहे. स्वाभाविकच आपल्याला वैदिक देवता इन्द्राची या संदर्भात आठवण होते. इन्द्र ही वैदिक आर्यांची युद्धदेवता व सेनापती होती.

थोडे विवेचन 'रिन्ड' या शब्दाचे करणे आवश्यक आहे. रिण्ड ही मूलत: कच्छ-काठेवाडमधील 'रिन' वा 'रन' ही खाऱ्या पाण्याची नदी. हे नाव संस्कृत 'अ-रण्य' या शब्दापासून निष्पन्न होते. आद्य ऱ्हस्व -स्वर-लोप प्रक्रियेमुळे ते 'रण्य'. ग्रीक इतिहासकारांनी त्याचा उल्लेख (Erinos) असा केला आहे. खरं तर हा शब्द मूळ 'इरिण' असा आहे. व त्याचा अर्थ 'खारी नापीक जमीन'. याचमुळे 'इरण्य' म्हणजे वाळवंट.या 'इरिण्य' चे रिण (रिण्ड) हे अपभ्रष्ट रूप आहे.

हे विवेचन मान्य केले तर टोळीचे 'रिन्ड' हे नाव

व 'इन्द्र' हे वैदिक देवतेचे नाव परस्परसम्बद्ध आहे, हे कळून येईल. खरे तर वर्णविपर्यासाने इन्द्र या नावाचेच रिन्द असे झाले असावे. पठाणांच्या वंशावळ्यांनुसार रिण्ड हे नाव मीर जलालखान, बलुचींच्या आद्यपुरुषाच्या थोरल्या मुलाचे नाव आहे.

बलुचिस्थानातील लास (Las) प्रदेशातील एका टोळीचे नाव आहे, Angarih अङ्गरिह् . वस्तुतः वैदिक अङ्गिरस या गोत्रनामांची अङ्गरिह्/ अङ्गर्य ही अपभ्रष्ट रूपे आहेत व ही सर्वच नावे व नामधारक वंश व जमाती (टोळ्या) या मूळ आर्य – भारतीय आहेत.

अङ्गिरसांमधील सर्वाधिक प्रतिभावान ऋषी बृहद्वाज हा बृहस्पतीचा मुलगा व अङ्गिरसाचा नातू आहे. (शर्मा पान ५१) यांना तोकि (Toki) असेही म्हणतात. तोकी असल्याने त्यांचा पंजाबशी संबंध. किंबहुना एके काळी पंजाबला टक्कदेस (पहा – उपभाषा – नाम 'टक्की') अथवा वाहीक म्हणत असत. (पहा – काव्यप्रकाशातील प्रसिद्ध उदाहरण "गौर्वाहीकः") हेमचन्द्र त्याच्या कोशात म्हणतो 'वाहिकाष्टक्कनामानो'

लुम्रिस (Lumris) /नुम्रिस (Numris) हा एक प्रविभाग आहे (section) लास बेल (Las Bel) याचा. त्यालाही 'अगर्य' असे नाव आहे.

Bellew च्या मताने ही एक प्रसिद्ध टोळी होती, जिचे वास्तव्य पर्शियन गल्फ व अरबी समुद्राच्या तटावर होते. Bellew ला असेही वाटते की, हे अङ्गिरा ब्राह्मण किंवा अग्गर राजपूत असावेत. याला पुस्ती देताना मी वाचकांना सध्या प्रचलित असणारे 'अगरवाल' हे आडनाव निदर्शनास आणून देईन. वस्तुतः ही व्यापारी जमात (समाज) होती. मथुरेजवळील पेठ्यांसाठी प्रसिद्ध असलेल्या आग्रा शहराशीही माझ्या मते याचा संबंध आहे. कारण अगरवाल याचबरोबर अग्रवाल ('आग्रा' वाला) हे व्यापारी घराणेही प्रसिद्ध आहे.

आजमितीस सिंधमधून आलेला व कच्छमध्ये स्थिरावलेला एक मुस्लीम वर्ग आहे. त्याचे नाव आगोरिया. बहुतेक हे बाटलेले मुसलमान. मूळचे राजस्थानी राठोड असावेत. मुळात सिंध हे बृहस्पतीचे अधिराज्य होते. बृहस्पती हा अंगिराचा मुलगा होता हे आपल्याला आधीच माहीत आहे. अशा रीतीने आगोरिया या बाटलेल्या मुस्लिमांच्या नावाचा ऐतिहासिक संबंध 'अंगिरा' पर्यंत जाऊन पोचतो.

भरद्वाज यांचा पणींशी विविध रूपांनी संबंध आला. शत्रू व मित्र. पण मित्र या नात्यापेक्षा शत्रू या नात्यानेच अधिक संबंध आला. प्राचीन वैदिक साहित्यात भरद्वाज व पणी यांच्यातील तंटे–बखेडेच अधिक प्रमाणात दिसून येतात. (Sarmah P. S. Sliende also).

Bellew च्या मताने बर्देज (Bardesa) हा जोक्य (Jokya) यांचा एक विभाग आहे. वस्तुतः जोक्य यांचा या न्युग्रिस गटाशी संबंध होता, तर न्यूग्रिस यांचे मूळ राजपुतांच्या बरेज (Bareja) या व्यापारी मालाशी संबद्ध होते (mercantile) (पहा Sarmah, P, 204 and R. N. Dandekar P. 111.) उघडउघड बर्देज (Bardej) हा भारद्वाज नामाचा अपभ्रंश आहे. भारद्वाज या आडनावाने अनेक जातींमध्ये काळाच्या ओघात शिरकाव (infiltration) करून घेतला आहे.

Dames ने सादर केलेल्या अनेक बलोच वंशावळींत एकात बष्कलि हे सहक यांच्या माध्यमातून रिन्ड यांचे वंशज असल्याचे आढळून येते. (Dames P. P. 77-78, tables ii & iii)

Bellow (P. P. 180-182) काफिरिस्तान येथील बाष्गाली (Bashgali) याची ब्रहवीस (Brahvis) गोत्राचा एक भाग अशी नोंद करतो. हे बाष्गील कलत व दक्षिणेकडील डोंगराळ मुलखात विखुरलेले होते. बलोच टोळ्यांमधील पघ (pagh), पझ्ह (Pazh) व फोग (Phoga) यांचे समीकरण बष्गलीशी असल्याचे दिसून येते. काफीरांमधील पश आणि बश हे लुम्रि व जोम्य यांच्यात मोडतात आणि यांच्यातच अंगर्य, बर्देज व पंडे यांचा समावेश होतो. Bellew पंडे पण्ड्या/पण्डित म्हणजे पंडे ब्राह्मण असे समीकरण मांडतो. माझ्या मताने हे पंडे ब्राह्मण म्हणजेच कश्मीरातील (सारस्वत?) पंडित, ज्यांनी पुढे जाऊन काशीच्या तीर्थस्थळाचे अधिकारपद मिळवले. कोणासही आपल्या वंशाच्या-पूर्वजांच्या नावाचा शोध घ्यायचा असल्यास त्यांनी काशीच्या पंड्यांकडे आजवर सुरक्षित ठेवलेल्या वंशावळींच्या गुंडाळ्या शोधाव्यात, असे माझे वैयक्तिक मत आहे. खरे तर शासनाकडून अनुदान घेऊन, चित्रावशास्त्रींचे

अनुकरण करून कोणत्या तरी प्राच्यविद्या संशोधन संस्थेने हे फार मोठे कार्य हाताशी घेऊन पूर्ण करावे. यामुळे एक फार मोठे योगदान घडेल.

या संदर्भात पुढे जाऊन हे पहायला हवे की, बष्कली म्हणजेच बाष्कली भारद्वाज कशावरून? बाष्कली भारद्वाज हा सत्यश्वीच्या तीन शिष्यांपैकी एक होता. बाष्कलाच्या पाच पिढ्यांच्या नंतरचा होता आणि बाष्कल हा पैल याचा समकालीन होता.

बाष्कली भारद्वाज याचा काळ विद्वानांच्या मताने ख्रिस्तपूर्व २९५० च्या जवळचा असावा. आणि याच बाष्कली भारद्वाजाने ऋग्वेदाच्या तीन शाखा संहित केल्या. (Sarmah. P.P. 306-311 & XSK. 10). व (Dames P.P.63, 74-75). Wasuvani (वासुवानि). येथे सिंधी साधु वास्वानी यांची आठवण व्हायलाच हवी. त्यांच्या पूर्वजांविषयीचे हे विवेचन आहे. डेम्सच्या मते वासुवानि (वास्वानी) हे कुळ किंवा घराणे आहे. वासुवानि हे लाशारी (Lashari ) कुळ हे मघस्सी (Maghassi) टोळीतील होते. माझ्या मताने मघस्सी ही लढाऊ टोळी सिंधमधील मघ जातीच्या अश्वांवर आरूढ होऊन युद्ध करत असावी. वेदसाहित्यात 'सैन्धवो हयः' हा उल्लेख आढळतो. याच संदर्भात इन्द्राचे 'मघवन्' हे बिरुद व पाली जातक वाङ्मययातील निदान कथेतील 'मघ' ब्राह्मणाचीही संगती लावण्याचे प्रयत्न व्हावयास हवेत.

वासुवानि हे वंशभेदनाम (Sept) काहीशा उच्चारभेदाने बोलण्यात येते. यातील 'आनि' प्रत्यय हा षष्ठीबहुवचनाचा प्रत्यय आहे. तो पितृकुळाचा निदर्शक आहे. सध्या आपल्याला तो खूबचन्दानि, अडवानि, साहानि, बुधवानि, संगतानि या सिन्धी कुलनामांत दिसतो. वसु हा आद्यपुरुष असल्याने वासुवानि कुलातील लोक त्याचा आडनावासारखा उपयोग करतात. तो पितृनामाचा (Patronynic) निर्देश आहे. वासुवानि येणेप्रमाणे वसुभारद्वाज कुलातील होते. ऋग्वेदातील तीन सूत्रे (Sarmah P. 141; Athar vaveda II. 12. 4. refers to Vasus apparently descendents of Vasu] along with आदित्य and Angirasas as protecting a person against the enemies ).

मघस्सी टोळीत एक गाधी (Gadhi) नावाचे कुळ आहे. हे गाधी बहुदा रिण्ड टोळीतील गाधी कुळाशी संबन्धित असावेत. (Dames. P. P. 72 & 74 )

लुण्ड नावाच्या टोळीचाही एक प्रविभाग (section) गोधदी म्हणून ओळखला जातो. यांना Bellew (P. 165) खत्री व भारतीय गुराख्यांच्या टोळ्या समजतो.

वरील पुराव्यावरून माझ्या मते आपण गाधी या कुलनामाचा संबंध गाधि गोत्राशी लावू शकू. गाधि हा गर्ग या भारद्वाजाचा उपगण आहे. (Sarmah. P. P. 326-328)

एका प्रमुख बलुची टोळीचे नाव आहे सञ्जरानि. सञ्जरानि हा होतवानि कुलाचा एक प्रविभाग आहे. होतवानि हे गुरछानि टोळीशी सम्बद्ध आहेत. सारङ्गानि हा लोहारानि कुळाचा प्रभेद आहे. लोहारानी हे मर्री टोळीत मोडतात.

सञ्जरानि हा प्रभेद लोहारानी घराण्याचा आहे. लोहारानी घराणेही मर्री टोळीत समाविष्ट होते. सञ्जरानि हा प्रभेद मसीदानी घराण्याचा आहे. मसीदानी घराणे हे स्यह-लफ् मझारिस आहे. सञ्जरानि हा प्रभेद मुघेरी घराण्याचा आहे. हे घराणे मघस्वी टोळीत मोडते. (Dames P. P. 52, 65, 70, 71,75.). प्लिनी हा इतिहासकार ज्यांचा निर्देश सैइस्तान (Seistan) या अफगानी प्रदेशातील सरङ्गइ (Sarangai) म्हणून करतो, ते हेच असावेत. यांनाच क्वचित द्रङ्गए (Drangae) किंवा झरङ्गए (Zarangae) असे म्हणत (W.W.Tam. The Greeks in Bacteria and India. Reprint. Cambridge, 1986 P. 285.) झरङ्गइ म्हटले की का कुणास ठाऊक, मराठीतले झरंगे हे आठवते.

ब्रूनहॉफर (Brunhofer) याच्या मते हे द्रङ्ग वा झरङ्गए हे द्रङ्गिआना (Drangiana) या देशातील (प्राचीन पर्शियानातील झरङ्क (Zarank) येथील रहिवासी यांना ग्रीक झरग्गइ (Zaroggai) म्हणून ओळखत असत. हिरोडोटस यांनाच सरग्गइ किंवा सरग्गीज् (Saragai/ Saraggees) म्हणत असे, तर स्ट्रॅबो (Strabo) व अर्रिअन (Arrian) यांना दरग्गइ (Darogia) म्हणून संबोधत असत. (Hillebrantdt. Vol. I.P.P.346-347) हे सर्व नामपर्याय उघडपणे ऋग्वेदातील सृञ्जय या नावाचे अपभ्रंश आहेत. सृञ्जय टोळ्या या भारद्वाजांशी सम्बद्ध होत्या. ज्याने पर्णीचा पराजय केला तो दिवोदास हा

अनुक्रमणिका

भारद्वाजांचा फार मोठा आश्रयदाता होता. खरे तर हा दिवोदास विदथिन् भारद्वाजाचा लांबचा वंशज होता. या विदथिन् भारद्वाजाला भरत दौष्यन्तीने दत्तक म्हणून स्वीकारले होते. (Sarmah.P. 137)

ऋग्वेदातील एका दानस्तुति-सूक्तात प्रत्येक सावञ्ज्याबरोबरच दिवोदासाची स्तुती करण्यात आली आहे. (Vedic Index Vol. ii. P. 469). या दोघांतील घनिष्ट संबंध अशा रीतीने सुस्पष्ट होतात.

ऋग्वेदात ("Seers in the Rigveda". V. G. Rahurkar. P. 235) अङ्गीरस हे प्राचीन काळातील थोर ऋषी म्हणून नावाजले आहेत.अथर्ववेदात अङ्गीरसांना देवांच्या पंक्तीत बसविण्यात आले आहे व आदित्यांबरोबर अंगीरसांनाही घृतमिश्रित मधाच्या आहुती अर्पण केल्या गेल्या आहेत. अथर्ववेदाप्रमाणेच ऐतरेय ब्राह्मणाने अङ्गीरसांना देवकोटीत नेऊन बसविले आले आहे. (N. J. Shende "Angirasas in the Vedic Literature." ABORI. xxxi. PP. 108-131. Atharvaveda. IV. 23. 5. Jaminiya Brahmana. ii. 440. Brhaddevata. Viii. 26.) याउलट पणींना असुर म्हणण्यात आले आहे. (Wendy Doniger. The Rgveda : An Anthology. Penguine. 1981. P. P-6)

अशा रीतीने, देव-मानवलोक व असुरलोक यांना एकमेकांपासून दूर ठेवणारी रसा नदी ही रक्षान नदीच असली पाहिजे, या अनुमानाला प्रतिष्ठा प्राप्त होते. ज्या अर्थी रक्षान ही नदी अंगीरस लोकांची परिसीमा दाखवते, त्या अर्थी ती सर्व जगताच्या भोवती वाहत असल्याचे स्पष्ट होते. (ऋग्वेद. १०. १०८. ५.). येथे 'परि दिवो अन्तान्' अशी शब्दसंहती वापरली गेली आहे. रसा द्युलोकाचा भोवतालचा सर्व परिसर व्यापते. याचमुळे ज्या वेळी सरमा रसा नदी पार करते, त्या वेळी ती द्युलोकाच्या सर्व सीमा पार करून आली, हे या संदर्भातून स्पष्ट होते.

वि-दएव-दात् (Vi-Daeva-dat) [James Dermesteter The Zend-Avesta. Pt. i. The Vendidad, SBE. iv. P. q; fergard I. 21 (76.)] आपल्याला सांगते की, अहुरमज्दाने निर्मिलेल्या सोळा देशांपैकी एक (सोळावा) हा रंघा नदीच्या पुराखालील (land of floods) देश होता व तेथे केवळ शिरोविरहित कबन्ध राहत असत. हे अगदी उघड आहे. शिरस् (मुख्य) या शब्दाचा आलङ्कारिक अर्थ आहे. कोणालाही नेता (मुख्य-शिरोभागी) न मानणारे श्रद्धाहीन लोक या देशात वास्तव्य करीत होते. ते सर्व नियम धुडकावून लावणारे बंडखोर (rebels) होते. जर अवेस्तातील रंघ ही ऋग्वेदातील रसा असेल, थोडक्यात रक्षान असेल, तर ती ब्रह्मपुत्रेप्रमाणे पूर येणारी नदी असली पाहिजे आणि तिच्या तीरावर वसती करणारे लोक कुणालाही नेता म्हणून मानणारे, जुमानणारे नव्हते. हे सर्व वर्णन रक्षान नदीला पूर्णपणे लागू पडते. पठाण हे कोणाचेही नेतृत्व न मानणारे, कायदे झुगारून व्यवहार करणारे होते.

रसा म्हणजे रक्षान या अनुमानाला दुजोरा पुरातत्त्वविद्येच्या पुराव्यांतून मिळतो.

अङ्गीरसांचा विशेष संबंध अग्नीशी होता. व्युत्पत्तिशास्त्रानुसार अङ्गीरस हे नाव अंगार (burning charcoal) किंवा 'निखारा' याच्याशी सम्बद्ध आहे. अग्नीला ज्याने निर्माण केले, त्याला अङ्गीरसांचे नाव प्राप्त झाले. अग्नि = अङ्गीरस हे कायमचे समीकरण रूढ झाले.

अंगीरसांनी स्वतःच्या हातांनी अग्निमंथन करून, निर्माण केलेला अग्नी पणींच्या राहत्या जागेवर टाकला. ते बाहुभ्यां मथितमग्नि नकिः णो अस्त्यरणो जहुर्हि तम्। (ऋग्वेद २. २४. ७.) अङ्गीरसांनी अरण्यातील वृक्षांमध्ये दडलेला अग्नी शोधून काढून त्याचे अरणींनी मन्थन करून त्याला अस्तित्वात आणले. ("Seers of the Rgveda", V. G. Rahurkar p. 235.). यामुळेच अग्नीला अङ्गीरस म्हणतात. (ऋग्वेद. ५. ११. ६. "त्वामग्ने अङ्गीरसो गुहाहित-मन्वविन्दसि श्रियाणं वनेवने। स जायसे मथ्यमानः सहो महत्, त्वामाहुः सहस्पुत्रमङ्गीरः।।') अङ्गीरसांनी प्रथमतः इन्द्राला आहुती अर्पण केल्या. (ऋग्वेद २. २४. ७.) एके ठिकाणी असा उल्लेख आला आहे की, अङ्गीरसांनी त्यांच्या सत्कृत्यांमुळे पणींची सर्व संपत्ती हस्तगत केली. (ऋग्वेद. १. ८३. ४. आदङ्गीराः प्रथमं दधिरे वयं इन्द्राग्रथः शम्या ये सुकृत्यया। सर्वं पणेः समविन्दन्त

भोजनम श्वावन्तं गोमन्तमा पशुं नरः।।)

बृहस्पतीही शत्रूंचा अग्नीच्या साह्याने विनाश करतो. (ऋग्वेद ६. ७३. ३. ड. बृहस्पतिर्हन्त्यमित्रमेकेः) एके ठिकाणी असे म्हटले आहे की, अग्नी व सोम यांनी पणींकडून गायी मिळविल्या आणि बृसयाचे उरलेसुरले वंशजही नष्ट केले. (ऋग्वेद. १. ९३. ४.) अग्नीने मूढ, उद्धट, कद्रू, यज्ञांवर विश्वास न ठेवणाऱ्या, दस्यू पणी यांना पूर्वेपासून अतिपश्चिम प्रदेशात हुसकावून लावले.

अङ्गीरसांनी अग्नीच्या द्वारा युद्धात पणींवर विजय प्राप्त केला आणि त्यांची तटबंदीची शहरे नष्ट केली, असे म्हणणे चुकीचे ठरू नये. याला पुरावा पुरातत्त्व खात्याच्या उत्खननामुळे प्राप्त होतो. G. P. Dale च्या अभ्यासामुळे १९६० साली हरप्पा येथील तटबंदी शहरांचा विध्वंस झाल्याचा शोध लागला. पिगॉटने (Pigott) उत्तर बलुचिस्थानात जळलेल्या स्तरांचा आढळ होतो याकडे आपले लक्ष वेधले. याचा अर्थ कोणत्यातरी मानवसमूहाने आग लावून हा प्रदेश 'अग्निसात' केला असा होतो. हा काळ सुमारे ख्रिस्तपूर्व तिसरे सहस्रक. हा जळलेला प्रदेश रण घुण्डई (Rana Ghundai) व दबरकोटचा (Dabarkot) चा होता.

या उपलब्धी पणी व अङ्गीरस यांच्या अखेरच्या अग्नियुद्धांचा निर्णायक पुरावा आहेत. हे सर्व रक्षानच्या तीरावर झाल्यामुळे पणींची रसा व रक्षान या एकच होत्या, या गृहीताला पुष्टी प्राप्त होते.

'रसा' चा उच्चार रक्षान होणे हे भाषिक दृष्ट्या सहज शक्य आहे. संस्कृत 'ष' या वर्णाचे रूपान्तर प्राचीन पर्शियन भाषेत 'क्ष' असे होते. आन् या प्रत्ययाची जोडही सुसंगत ठरते. जसे पक्थ – पक्थान्, द्वयक्ष – बदक्षान्, वल्गु – बघलान्.

बदक्षान् हे अफगाणिस्थानातील एक प्रदेशनाम आहे, बदक्षाम् हे प्रदेशनाम बदक्षान नदीमुळे प्राप्त झाले.

पक्थ (पक्थिनः = पठाण) ही ऋग्वेदातील प्रसिद्ध जमात आहे.

भाषिक वर्णोच्चारप्रक्रियेचे काही खास, निश्चित नियम नाहीत. आपण जास्तीत जास्त काही प्रवृत्तींबाबतच बोलू शकतो. उदा., संस्कृत 'स' > अवेस्ता 'ह'; सप्तसिन्धु वेन्दिदाद 'हप्तहिन्दवो.' वैदिक 'ह' अवेस्ता 'झ.' उदा., बाहू = बाझु Bazu (अनेकवचन Bazva), सहस्र > हजस्र– हजार इत्यादी. बाझु > बाजु– बाहुबन्ध – 'बाजुबंद.'

'कारोती' हे प्रदेशनाम चार हजार वर्षांनंतरही तसेच्या तसेच राहते; त्यात काहीच बदल होत नाही. आसन्दीवती या नगरीच्या नावात केवळ 'वतुप्' प्रत्ययाचा लोप होतो व उरते ते नगरीचे नाव असन्ध (Asandh.)

याउलट, 'प्लक्ष-प्रास्रवण' या नावात ओळखणे कठीण व्हावे एवढा विचित्र बदल होतो व आज त्याचे रूप आपण ऐकतो ते लवासा – पच्छाड (Lavasa-Pachhad). आजमितीस पुण्याजवळ एक आदर्श टुमदार नगर वसवले गेले आहे, ज्याचे नाव 'लवासा' आहे. बहुधा पूर्वी येथे प्लक्षवृक्षांचे बाहुल्य असावे. चिंचवड, पांचवड (पञ्चवटी), पिंपळे या गावाच्या नावासारखे 'लवासा' (प्लक्षनगरी) हे नाव असावे.

काही असो, प्लक्ष – लवासा एवढा विलक्षण उच्चारभेद (drastic chage in pronunciation) रसा व रक्षान यांत निश्चित नाही.

निर्णयसारांश सांगायचा झाला, तर रसेची सर्व वैशिष्ट्ये आपल्याला रक्षानमध्ये दिसतात. रसा – रंघा – रंहा – रक्षान हे समीकरण निश्चित पुराव्याच्या पायावर आधारित आहे.

आजमितीसही बलुचिस्थान व अफगाणिस्थान यांत दोन परस्परविरोधी गट आढळतात. एका बाजूला पणी, दस्यू, दास, पारावत व बृसय तर दुसऱ्या बाजूला अङ्गीरस व त्याचे सहकारी भारद्वाज बाष्कली, वसू, गधी आणि सृंजय. या दोन गटांतील युद्धात मुख्यत्वे अग्नी या दाहक साधनाचा (पौराणिक परिभाषेत 'आग्नेयास्त्र' म्हणू शकतो.) उपयोग झाला, हे पुरातत्त्वीय पुराव्यावरून सिद्ध होते.

रसा व रक्षान हे समीकरण प्रथमतः मांडण्याचे श्रेय ओ. पी. भारद्वाज (कदाचित ते 'भारद्वाज' असल्याने) यांना जाते. (पहा. Indologia Taurinesia. vol. XXX. 204. PP. 9-25).

मी त्याचा पाठपुरावा करून अधिक काही भाग पुष्ट्यर्थ जोडला, एवढेच माझे कर्तृत्व. पण आम्हा दोघांमुळे रसा-रक्षान हे समीकरण सिद्ध झाले व आजवर न








सुटलेल्या एका ऋग्वेदीय भौगोलिक समस्येवर निश्चित तोडगा निघाला, हे वेदाभ्यासक मान्य करतील, अशी अपेक्षा आहे.

**संदर्भ ग्रंथांचे संक्षेप**


Bellew. (H. W. Bellew "An Inquiry into the Ethnography of Afganistan. Reprint. Karachi. 1977.')

Buller. R. Hughs Buller. A Gazetteer of Baluchistan. Reprint. Gurgaon. 1989.

Caroe. Olaf Caroe. The Pathan's 550 B. C. A. D. 1957. London 1958.

Dames. Longworth Dames. The Baloch Race. London. 1904, Glossary.

Denzil Hillebrandt. Vedic Mythology. Two volumes. English-ed. Delhi. 1980.

Alfred Hillebrandt. Vedic Mythology. Two volumes English ed. Delhi. 1980.

IGI. Imperial Gazetteer of India. oxford. 1908

Mason. Chorles Mason. Narrative of the Journey of kalot London 1843.

Oliver. Edward E. Oliver. Across the Border or Pathan and Baloch. London 1980.

Panjab castes. Reprint. Patiala. 1970.

R. V. Rigveda samhita with the comm. of Sayana. Five Volumes. Vaidik Sanshodhan. Mandal, Poona. Sarmah. Thaneswar sarmach. The Bharadvajas in Ancient India. Delhi. 1991.

Seers. V. G. Rahurkar., The Seers of the Rgveda Poona. 1964.

V. I. Vedic Index M. A. Macdonell and A. B. Keith. Two volumes. Reprint. Delhi. 1967.


ఆఆఆ

---



अनुक्रमणिका

# मराठीच्या अध्यापनाची विचारसूत्रे

राजेंद्र गोविंदराव नाईकवाडे

अध्यापनप्रक्रियेचे उद्देश विविध प्रकारांनी सांगितले जातात. "माणसाची जगण्याची क्षमता वाढवणे, भोवतालचे जग आत्मसात करणे व करायला शिकवणे, ते आटोक्यात आणणे वा आणण्याची शक्यता साक्षात करून देणे"[१] किंवा "उपयोगी सक्षम सामाजिक घटक निर्माण करण्यासाठी तांत्रिक व सांस्कृतिक कौशल्य शिकविणे व त्याद्वारा माणसाच्या मुलाचे संस्कृतिसापेक्ष सामाजिकीकरण साधणे"[२] किंवा "ललित वाङ्मयाचा आस्वाद घेताना आपल्यावर जीवनासंबंधीचे ज्ञानात्मक व नैतिक संस्कार होतात आणि हे दोन्ही संस्कार माणसाला स्वतःला घडवण्यास व पर्यायाने समाजाला घडवण्यास कारणीभूत होतात म्हणून इष्ट त्या समाजधारणेसाठी ललित वाङ्मयाचे अध्ययन-अध्यापन आवश्यक आहे."[३] किंवा "....साहित्याच्या विद्यार्थ्यांचे उद्दिष्ट समीक्षक होणे हे असते."[४] किंवा "....कोणत्याही कालखंडातील वाङ्मयाचे अध्ययन-अध्यापन हे केवळ वाङ्मयसौंदर्यासाठीच केले गेले पाहिजे...वाङ्मयाचे आकलन, आस्वादन आणि मूल्यांकन ही सारी सौंदर्यशोधनाच्या संदर्भात व्हावयास हवी."[५] अथवा "कोणताही अध्यापनव्यवहार हा मुख्यतः ज्ञानदानाचा आणि ज्ञानसंपादनाचा व्यवहार असतो."[६] अशा विविध अवतरणांवरून असे लक्षात येते की, सर्वसाधारणपणे सुसंस्कारित मनुष्य आणि सुसंस्कारित समाजनिर्मितीच्या घडणीसाठी अध्यापनक्रियेचा प्रपंच असतो. इष्ट समाजधारणेसाठी म्हणजेच एका उन्नत, श्रेष्ठ ध्येयासाठी शैक्षणिक अध्यापनप्रक्रिया उभारली जाते व राबवली जाते. एका गंभीर, पवित्र आणि समाजोन्मुख उद्दिष्टाने भारावलेली ध्येयनिष्ठ आदर्शवादी अशी ही प्रक्रिया असते. हजारो वर्षांपासून विविध स्तरांवर ह्याच ध्येयवादाने प्रेरित होऊन आजवर अध्यापनाचे कार्य चाललेले दिसते. काळाच्या ओघात अनेक गोष्टी बदलल्या असतील; पण सुंदर समाजधारणेचे स्वप्न अजूनही अध्यापनप्रक्रियेने टाकलेले नाही. त्यात बदल झाला नाही आणि [illegible] संभवतही नाही. अर्थात शिकविणे किंवा अध्या[illegible] [illegible] एखादी अभेद्य चौकट उभी करणे किंवा ती [illegible]; तर केवळ योग्य अध्ययनप्रसंग निर्माण करणे, विशिष्ट असे संस्कारसंपन्न वातावरण अवतीभवती उभे करणे..... असा अर्थ अभिप्रेत असतो. कारण 'सा विद्या या विमुक्तये' अशी बंधनातून, चौकटीतून, संकुचितपणातून....विशालतेकडे, मुक्तीकडे, स्वातंत्र्याकडे झेपावण्यासाठी उपलब्ध करून दिलेली व्यवस्था म्हणजे शिक्षण व अध्यापन. ह्याचे वर्णन अध्यापनक्षेत्रात 'चौकटीतून, चौकटीच्या साहाय्याने, चौकटमुक्त होणे', या शब्दावलीने केले जाते, जे सर्वश्रुत आहे. कलासाहित्याच्या अध्यापनाचेही हेच महत्त्वाचे सूत्र आहे.

आपल्या भारतीय शिक्षणव्यवस्थेत भाषा आणि साहित्य यांचे अध्यापन करण्याच्या दृष्टीने शिशु[illegible]पासून तारुण्यापर्यंत साधारणपणे विविध सात शै[illegible] [illegible] करण्यात आले आहेत. यामध्ये मराठीची अ[illegible] उद्दिष्टे पुढीलप्रमाणे कमीअधिक प्रमाणात सर्वमान्य आहेत– पहिल्या बालवाडीच्या टप्प्यावर परि[illegible] अशा निसर्गकोशातील विविध ध्वनींचा अनुभव शि[illegible] घेऊ देणे व मानवनिर्मित ध्वनिसंघटनांचाही अनुभव देणे हे उद्दिष्ट असते. दुसरा, वर्ग १ ते ४ चा टप्पा हा विविध भाषिक रचनांमधील गमती अनुभवू देणे, तसेच मानवनिर्मित ध्वनिसंघटनांमधील आणि विशिष्ट भाषिक रचनांमधील लय जाणवून देणे हा असतो. तिसरा, पाच ते सात इयत्तांचा टप्पा, लय व ताल यांची जाणीव, भाषिक आकृतिबंध व कविता यांच्या परस्परसंबंधांचे भान इ. गोष्टींनी घडत असतो. पुढील ८ ते १० च्या गटातील मुलांना व्यक्तिविशिष्ट [illegible] अनु[illegible] [illegible] भाषिक संघटनांचे, [illegible] आणि [illegible] अनुभव घेऊ देणे [illegible]नूर्ण ठरते. ११ व [illegible] [illegible] टप्प्यावर मुलांना [illegible] प्र[illegible], [illegible], [illegible],






लयबद्ध रचना बनवण्यास सांगता येते. पुढील पदवीच्या तीन वर्षांच्या काळात भाषिक रचनांचा वेगळेपणा, त्यातील आकृतिबंधात्मक संगती ह्यांचा अभ्यास, त्याचप्रमाणे व्यक्तिगत वाचन, आस्वाद, अनुभव, आकलन, सौंदर्यानुभूती इत्यादी गोष्टींची जाणीव निर्माण होणे महत्त्वाचे ठरते. यात काही प्रकल्प वगैरेंच्या साहाय्याने अध्ययनप्रसंगाची निर्मिती करता येईल. एम. ए. च्या पातळीवर विशिष्ट बुद्धिशील व्यक्ती म्हणून सिद्ध झालेल्या विद्यार्थ्यास विविध साहित्यकृतींचे व्यक्तिविशिष्ट बुद्धिशीलतेतून मूल्यमापन, आकलन, सौंदर्यग्रहण करता यावे. अशी विविध पातळ्यांवरील मराठीच्या अध्यापनाची सर्वसाधारण उद्दिष्टे असतात.[७] वाङ्मयाच्या अध्यापनाची उद्दिष्टे ठरविताना आणखी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. ती म्हणजे वाङ्मयव्यवहाराच्या एकूण जीवनातील कार्याच्या स्वरूपावर ही उद्दिष्टे आधारलेली असतात. या संदर्भात दोन प्रमुख विचारप्रवाह आढळतात. एक म्हणजे वाङ्मयाचा व्यवहार. हा हेतुनिरपेक्ष असून तो केवळ सौंदर्यास्वादासाठी घडतो, ही एक भूमिका आणि हा व्यवहार जीवनोपयोगी असून तो जीवनाचे अर्थपूर्ण दर्शन घडवतो, ही दुसरी भूमिका. दुसऱ्या भूमिकेत वाचकांचे व्यक्तिमत्त्व समृद्ध करणे, जीवनात माणसाला मार्गदर्शन करणे, जीवनपरिवर्तनाची त्याला प्रेरणा देणे इत्यादी गोष्टीसुद्धा अंतर्भूत होतात. विशेषतः एकूणच अध्यापनप्रक्रिया व शिक्षणप्रक्रिया ही दुसऱ्या प्रकारच्या धारणेशी निगडित असलेली दिसते. परंतु वाङ्मयाच्या अध्यापन विचारांमध्ये दोन्ही भूमिकांच्या समन्वयालाही जागा आहे, हे विसरून चालणार नाही. अशी समन्वयवादी सूत्रे डॉ. सुधीर रसाळ यांनी 'साहित्य : अध्यापन आणि प्रकार' मध्ये मांडली आहेत. ती पुढीलप्रमाणे– (१) ललित वाङ्मय हा मुख्यतः आस्वादाचा विषय आहे. (२) ललित वाङ्मयाचा दर्जा ठरविताना वाङ्मयीन मूल्यांचा वापर करावा लागतो. (३) कलाकृतीची एक अंतर्गत रचना असते. काही रूपसाम्ये असतात. त्यांच्या आधारे कलाकृतींचे क्षेत्र निर्माण होते. ते वाङ्मयप्रकाराच्या वैशिष्ट्यांनी व वाङ्मयीन परंपरा-प्रवाहांनी घडलेले असते. (४) वाङ्मयप्रकारांना वाङ्मयीन परंपरांचा-प्रवाहांचा इतिहास संभवतो. (५) लेखकाने निर्मिलेल्या वाङ्मयेकृतींमध्ये वाङ्मयीन व शैलीगत वैशिष्ट्यांचे नाते असते. वाङ्मयीन गुणवत्तेच्या दृष्टीने चढउतार असतात. (६) मानवी जीवन व मानवी अनुभव ही ललित वाङ्मयाची सामग्री आहे. ललित वाङ्मयात उमटलेल्या मानवी जीवनाची पाळेमुळे सामाजिक वास्तवात दाखवता येतात.[८] या आधारे वाङ्मयाच्या अध्यापनाची प्रमुख अंगे आणि अभ्यासाचे मार्ग डॉ. रसाळ आपल्यापुढे मांडतात. ते सर्वमान्य ठरावेत, असेच आहेत. ही अंगे– (१) वाङ्मयकृतीच्या आंतररचनेचा अभ्यास, (२) लेखकाचा अभ्यास, (३) वाङ्मयीन कालखंडाचा अभ्यास, (४) वाङ्मयप्रकारांचा अभ्यास, (५) वाङ्मयेतिहासाचा अभ्यास, (६) समीक्षाशास्त्राचा अभ्यास. याप्रमाणेच वाङ्मयाशी संबंधित काही संभाव्य अभ्यासविषय– (१) सौंदर्यात्मक (Aesthetic) अभ्यास, (२) सामाजिक दृष्टिकोणातून अभ्यास, (३) मानसशास्त्रीय अभ्यास, (४) संस्कृती-मानवशास्त्र यांच्या मदतीने अभ्यास, (५) तौलनिक वाङ्मयाभ्यास व (६) भाषाशास्त्र, शैलीशास्त्र यांचा अभ्यास (जो सौंदर्यात्म अभ्यासाचाच एक भाग ठरतो.) अशा प्रकारे सांगितले जातात. या अभ्यासासाठी वापरले जाणारे तीन मार्ग म्हणजे – (१) वस्तुस्वरूपाच्या शोधाचा विश्लेषण मार्ग (Analytical Approach). यात वाङ्मयकृतीच्या आंतररचनेचा व वाङ्मयप्रकाराचा अभ्यास समाविष्ट होतो. (२) वस्तुस्वरूपाची सामाजिक वाङ्मयीन कारणे शोधण्याचा उत्पत्तिमार्ग (Genetical Approach) आणि (३) वाङ्मयक्षेत्रातील परिवर्तनाच्या शोधाचा इतिहासमार्ग (Historical Approach). या अशा संकल्पनात्मक पार्श्वभूमीवरच वाङ्मयाच्या अध्यापनप्रक्रियेचा विचार केला पाहिजे, असे वाटते.

आगामी काळात शिक्षणक्षेत्रात कला-शाखा विद्यमान राहील काय? आणि राहिलीच तर त्यात वाङ्मयाच्या अध्ययन-अध्यापनाला स्थान राहील काय? असा प्रश्न सद्यःस्थितीत कुजबुजस्वरात सर्वत्र विचारला जाऊ लागला आहे. तथाकथित 'ज्ञानयुगात' किंवा कथित 'आधुनिक' युगात 'जीव पैशाला पासरी' झाला असताना

वाङ्मयाभ्यासाची समाजात कोणती निकड? असा प्रश्न अनेकांना सतावू लागला आहे. म्हणूनच "साध्य-साधनांच्या चक्रात अहर्निश फिरणाऱ्या व तंत्रज्ञ निर्माण करण्याचे उद्दिष्ट असणाऱ्या या काळात साहित्य हा विषय अजून तरी राहिला आहे!" असा उपहासगर्भ विषाद प्रा. दिगंबर पाध्ये यांनी ह्या विषयाचे चिंतन करताना व्यक्त केलेला दिसतो (आलोचना, जानेवारी १९७८ मधील 'साहित्यविषयक दृष्टिकोण व सामाजिक वास्तव' हा लेख). परंतु लेखात अन्यत्र म्हटल्याप्रमाणे समाज आणि संस्कृतीच्या अस्तित्वासोबतच वाङ्मयाचे आणि वाङ्मयीन अध्यापनाचे निकडीचे अस्तित्व राहणार आहे, यात शंका नाही. कालानुरूप अध्यापनशैली, परीक्षाशैली, शिक्षणकेंद्रशैली बदलतील; बदलाव्या लागतील. सध्या तशी गरज कधी नव्हे एवढी निर्माण झालेली दिसते. त्या दिशेने बदलाचे वारेही वाहू लागले आहेत. शालेय पातळीवर ते बदल स्वीकारून कार्यवाही सुरू झाली आहे. पदवी व पदव्युत्तर स्तरावरील अध्यापनप्रक्रियेलाही आता कुठल्याही वेळी या बदलांना सामोरे जावे लागणार आहे. दोन शतकांना जोडणारा हा संधिकाल, संक्रमणकाल असल्याचे स्पष्टपणे प्रतीत होते आहे. असाच संक्रमणकाल १९ व्या व २० व्या शतकांच्या मिलनकाळात भारतीयांनी अनुभवला होता. तसेच काहीसे आज झाले आहे. भारतीयता आणि पाश्चिमात्यता यांच्या संघर्षाचा जीवघेणा काळ पुन्हा एकदा भारतीय जनजीवनाच्या उंबरठ्याशी धडका देत आहे. आपल्या संस्कृतीच्या मजबूत पायावर उभे राहणे, न डगमगता उभे राहणे एवढीच काय ती परीक्षा आहे; पुढचे सारे मग फारसे कठीण नाही, असे जाणकार सांगत आहेत. 'भविष्याच्या गर्भातल्या नव्या बाळाचे', नव्या भारतीय उषःकालापूर्वीचे हे सद्यःकालीन 'रुदन' ठरणार, असा ठाम आशावाद भारतीय उराशी बाळगून आहेत. अशा वेळी परंपरेची शिदोरी हाताशी असणे फार गरजेचे आहे. ह्या प्रकाशात पुढची वाट नवतेला नीट दिसेल, यात शंका नाही.

मराठीच्या अध्यापनक्षेत्रातील नव्या मानकऱ्यांसाठी ही चिंतनाची, विचारांची शिदोरी आपल्याजवळ विद्यमान आहे. १९६८ पासून सुरू झालेल्या नागपूर विद्यापीठांतर्गतच्या मराठी प्राध्यापक परिषदेच्या वाटचालीला २००८ च्या एकोणिसाव्या अधिवेशनापर्यंत चार दशके पूर्ण झाली. अध्यापन-क्षेत्रातल्या ज्ञाननिष्ठांची मांदियाळीच परिषदांच्या आजवरच्या अध्यक्षांच्या रूपात आपल्यासमोर उभी राहते. ज्यांच्या अध्यापनव्रताला, अध्ययननिष्ठेला, वाङ्मयप्रेमाला अन् भाषाभिमानाला तोड नाही, अशी ही अध्यापकांची थोर परंपरा आहे. डॉ. मा. गो. देशमुख, भ. श्री. पंडित, श्री. मा कुळकर्णी, डॉ. अ. ना. देशपांडे, डॉ. द. भि. कुळकर्णी, डॉ. सुरेश डोळके अशा साहित्यिक-संशोधकांची ही परंपरा आहे. त्यांचे जीवनभरच्या व्रतातून निर्मिलेले कसदार चिंतन त्यांच्या अध्यक्षीय भाषणांमधून प्रकटले आहे. मराठीच्या अध्यापनाची आदर्श विचारसूत्रेच त्यांनी जणू प्रतिपादिलेली या भाषणांत दिसतात. वरील अध्यापन-अध्ययनविषयक विचारांच्या पार्श्वभूमीवर मान्यवरांनी मांडलेल्या अनुभवाधिष्ठित विचारसूत्रांचा हा मौलिक ठेवा समजून घेणे इष्ट ठरेल. (मराठीच्या अध्यापनाची विचारसूत्रे, संपादक डॉ. राजेंद्र नाईकवाडे, विजय प्रकाशन, नागपूर, २००८ : यापुढील सर्व संदर्भ प्रस्तुत पुस्तकातून घेतले आहेत.)

संत ज्ञानदेवांच्या 'मोगरा फुलला' या 'अक्षर'-रचनेचा काव्याच्या आकृतिबंधाच्या संदर्भात अन्वयार्थ लावताना प्रा. रमेश तेंडुलकरांनी 'काव्याच्या निर्मितिप्रक्रियेवरचे रूपक' म्हणून त्या रचनेची प्रतिष्ठापना केली आहे. 'इवलेसे रोप लावियले द्वारी, तयाचा वेलु गेला गगनावरी' ही शब्दवेल याच प्रकारे अध्यापनप्रक्रियेचाही बोध सुंदर रीतीने आपल्याला करून देईल, असे मला वाटते. अध्यापनप्रक्रियेची सुरुवात विद्यार्थिमनात किंवा व्यक्तिमनात पडणाऱ्या अध्ययन-विषयाच्या बीजारोपणाने होते. ते रोप वाढत जाऊन त्यास मोगऱ्याच्या ज्ञानप्राप्तीचा-आनंदप्राप्तीचा बहर येतो आणि सरतेशेवटी हा 'शेला' इष्ट समाजधारणेच्या अध्यापनप्रक्रियेच्या फलश्रुतीपाशी येऊन 'बापरखुमादेवीवरी' विसावतो. अशा या अध्यापनक्रियेशी संबंधित काही मौलिक विचारकण आपल्याला मराठी प्राध्यापक परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांमधून गवसतात. ती विचारसूत्रे अध्यापनविश्वापुढे मांडण्याचा प्रयत्न पुढील विवेचनात दिसेल.








संपूर्ण महाराष्ट्रात प्रमाण अशी ग्रांथिक मराठी म्हणून एकच भाषा विद्यमान आहे, हे मराठीचे वैशिष्ट्य नोंदवून या भाषेत आजवर साठवलेले शाश्वत विचारधन पुढील पिढीला देण्याची जबाबदारी प्रामुख्याने मराठीच्या प्राध्यापकांवर असल्याची जाणीव डॉ. मा. गो. देशमुखांप्रमाणेच अनेकांनी व्यक्त केली आहे. पूर्वी हे कार्य पत्रकार, विचारवंतांनी केले; आज ते प्राध्यापकांना करायचे आहे, असा विचार मा. गो. देशमुखांनी पहिल्या १९६८ च्या अधिवेशनात मांडला होता. ४० वर्षांनंतर त्यांचे ते मनोगत आजही फारसे अप्रासंगिक झालेले नाही असे दिसते. "मराठी भाषा आणि साहित्य यांच्याशी आपला सतत आणि जिव्हाळ्याचा संबंध असायला पाहिजे. साहित्याच्या क्षेत्राचे आपण एक महत्त्वाचे व जबाबदार घटक आहोत." हीच जाणीव प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांनीही आपल्या भाषणातून अध्यापकांना करून दिलेली दिसते. या संदर्भात डॉ. अक्षयकुमार काळे म्हणतात - "समाजाच्या सार्वत्रिक उन्नतीसाठी पायाभूत असणारा भाषाव्यापार आणि समाजाचे भावनिक, मानसिक आणि सांस्कृतिक भरणपोषण करणारा साहित्यव्यापार मूलतः मराठीच्या शिक्षणावरच अवलंबून आहे." अशा प्रकारे बहुतेकांनी मराठी भाषेच्या अस्तित्वासाठी, उन्नतीसाठी आणि समृद्धीसाठी मराठीच्या अध्यापकांवर फार मोठी जबाबदारी टाकलेली दिसते. त्यामुळे मराठी अध्यापनाच्या या व्यासपीठावरून बहुतेक मान्यवर मराठीच्या अस्तित्वाची चिंता वाहताना दिसतात. ज्याप्रमाणे साहित्यसंमेलनांच्या अध्यक्षीय भाषणांतून मराठीची चिंता आवर्जून व्यक्त होते, तसेच अध्यापकांच्या व्यासपीठावरूनही ही चिंता सार्वत्रिकपणे व्यक्त झाली आहे. मराठी भाषा, मराठी साहित्य आणि मराठीचा अध्यापक ह्यांच्या अन्योन्य संबंधाचे विचारसूत्र हे या भाषणांमधील ठळक विचारसूत्र आहे.

"अध्यापनप्रक्रिया म्हणजे शिकविणे ही प्रदानप्रक्रिया नाही, ती आदानप्रक्रियाच आहे. प्रत्यही नवे वाङ्मय, नवे साहित्य, नवनवे ज्ञान ग्रहण करणे व आपली पातळी अधिकाधिक उंचावणे याचेच दुसरे नाव अध्यापन आहे", हे मा. गो. नी पहिल्यावहिल्या भाषणात मांडलेले एक अध्यापनविषयक विचारसूत्र. अध्यापनासंबंधीचे हे सूत्र सर्वमान्यच आहे. या प्रक्रियेत विद्यार्थ्यांचाही सहभाग असावा आणि त्यांच्याशी सतत सुसंवाद साधीत राहिले पाहिजे, असे ते पुढे म्हणतात. श्री. मा. कुलकर्णी यांनी ह्या प्रक्रियेला तपश्चर्या आणि साधना म्हटले आहे. ही प्राध्यापक व विद्यार्थी यांनी मिळून करावयाची साधना आहे, असे ते म्हणतात आणि त्यासाठी 'दो होटि एक बोलणे। दोहि चरणि एक चालणे' असा ज्ञानदेवांचा दाखला देतात. या संदर्भात अ. ना. देशपांडे म्हणतात - "अध्यापन ही केवळ एकतर्फी प्रक्रिया नाही. अध्यापन = अ (शिक्षक) + ब (विद्यार्थी). अध्यापनात विद्यार्थी सहभागी झाल्याशिवाय त्याचे सार्थकच होऊ शकत नाही." अध्यापक आणि विद्यार्थी यांच्यातल्या संवादप्रक्रियेला डॉ. सुरेश डोळके 'हृदयसंवाद' ही संज्ञा वापरतात. बहुतेकांनी विद्यार्थी-प्राध्यापक हृदयसंवादाचे हे सूत्र आपल्या भाषणांतून मांडले आहे. त्यासाठी पुन्हा 'ये हृदयीचे ते हृदयी' असा ज्ञानदेवांचाच आधार घेतला आहे. अध्यापनप्रक्रियेत महत्त्वाची ठरणारी 'हृदयसंवादाची' ही संकल्पना डॉ. द. भि. कुलकर्णी यांनी थोडी वेगळ्या पद्धतीने मांडली असून वाङ्मयकृतीच्या आस्वादाचे स्वरूप हे त्रिस्तरीय असते, असे सांगितले आहे. अध्यापक, जो वाङ्मयकृतीचा आस्वाद घेतो व आपल्या विद्यार्थ्यांना घडवतो, तो आस्वाद वाङ्मयकृतीशी, वाङ्मयकाराशी आणि स्वतःशी केलेला हृदयसंवाद असतो. अशा प्रकारे 'आस्वादक हा निर्माता झाला पाहिजे', अशी अपेक्षा ते वाङ्मयाच्या अध्यापकाकडून व्यक्त करतात. 'अध्यापन ही सर्जनशील प्रक्रिया आहे', असे सांगताना मा. गो. नीही पूर्वी 'हृदयसंवाद' ही कल्पना मांडली होती, असे दिसते.

पदवी आणि पदव्युत्तर पातळीवरील निबंधवजा प्रश्न असणारी परीक्षापद्धती गतार्थ झाली असल्याची टीका १९६८ मध्ये मा. गो. देशमुखांनी केली होती व 'निदान अर्धे प्रश्न तरी विद्यार्थ्यांच्या वस्तुनिष्ठ ज्ञानाची, त्यांनी मिळविलेल्या माहितीची चाचणी घेणारे असावेत', असा एक उपाय सुचविला होता. त्यानंतर परीक्षापद्धतीचा पुनर्विचार करण्याची गरज प्रतिपादन करणारे हे विचारसूत्र जवळजवळ प्रत्येकच मराठी प्राध्यापकांचा ज्येष्ठ प्रतिनिधी गेल्या चाळीस वर्षांत

मांडत आला आहे; पण परीक्षापद्धती मात्र अजूनही बदललेली नाही. मग आपल्या ह्या गतानुगतिकतेला जबाबदार कोण? परीक्षापद्धतीमध्ये आमूलाग्र परिवर्तन करण्याची वेळ यापूर्वीच आलेली आहे, हेच यावरून दिसून येते. अलीकडे अशा प्रकारचे बदल महाराष्ट्रातील सर्वच विद्यापीठांतून होताना दिसत आहेत.

मराठीच्या प्राध्यापकाला संतसाहित्याचा व्यासंग अपरिहार्य आहे; कारण त्याशिवाय त्याच्या अध्यापनाला व्यापक सामाजिक बैठक प्राप्त होणार नाही, असे मत प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांनी १९७२ च्या आपल्या भाषणात त्या वेळी उद्घाटक म्हणून उपस्थित असलेल्या प्रा. गं. बा. सरदारांच्या साक्षीने मांडले होते. हे विचारसूत्र थोडे वेगळ्या स्वरूपात आपल्या संपूर्ण भाषणाचेच सूत्र डॉ. अ. ना. देशपांडे यांनी बनविल्याचे दिसते. अ. ना. देशपांडे यांचे १९७५ चे भाषण 'धर्म' या संकल्पनेभोवती फिरते. 'वाङ्मय आणि धर्म यांच्यात आत्मीयतेचा संबंध आहे... विद्यार्थ्यांना जे वाङ्मय शिकविले जाईल, ते प्राधान्याने धर्मभावनेचे पोषण करणारे असले पाहिजे.... अभ्यासक्रमातील पुस्तकांमध्ये धर्मदृष्टी असावी', असा आध्यात्मिक-धार्मिक प्रवचनकाराचा सूर त्यांनी त्यांच्या संपूर्ण भाषणात लावलेला दिसतो. त्यामुळेच अ. ना. देशपांडे यांचे ते भाषण ह्या संग्रहात त्यातील वेगळ्या पण एकसुरी मांडणीने उठून दिसते. प्राचीन वाङ्मयही आस्थेने शिकविले जावे व त्याविषयी दुजाभाव नको, असा कळकळीचा आग्रह डॉ. सुरेश डोळके यांच्या भाषणात दिसतो.

मराठी भाषेच्या प्राध्यापकांनी शुद्धलेखनाचा व शुद्ध (म्हणजे प्रमाण मराठी) उच्चाराचा आग्रह धरावा, हे एक महत्त्वाचे विचारसूत्र प्राध्यापक परिषदेच्या व्यासपीठावरून सातत्याने मांडले गेल्याचे दिसते. मा. गो. देशमुखांनी शुद्धलेखनाचे सूतोवाच त्यांच्या भाषणात त्रोटक व धावत्या स्वरूपात केले होते. पुढे अलीकडे डॉ. राजन जयस्वालापर्यंत हे विचारसूत्र साऱ्यांनी ठळकपणे नोंदविलेले दिसते. बोली आणि प्रमाण भाषेचा उभा केला जाणारा संघर्ष कसा व्यर्थ आहे, हेही अनेकांच्या भाषणांतून येऊन गेले आहे. या संदर्भात प्रा. श्री. मा. कुळकर्णी ह्या ऋषितुल्य ज्येष्ठ अध्यापकाने मांडलेले विचार प्रातिनिधिक व आदर्श ठरावेत असे वाटते. ते म्हणतात – 'भाषा ही नदीसारखी असली तरी बोली ह्या तिच्या उपनद्या आहेत. उपनद्यांनी मुख्य नदीचा प्रवाह विशाल केला पाहिजे, त्यांचे सातत्य टिकविले पाहिजे.... त्यांना (बोलींना) अवास्तव महत्त्व देऊन त्या प्रमाणात मध्यवर्ती नागर भाषेला दूर ठेवणे घातक आहे. भाषेचा अभ्यासक, मग तो ग्रामीण क्षेत्रातला असो की नागरी क्षेत्रातला, नागपुरी बोली बोलणारा असो की वऱ्हाडी, तसेच कोणत्याही वर्गातला व व्यवसायातला असो; नागर मराठी बोलणारा-लिहिणारा व तिच्यावर प्रेम करणारा झाला पाहिजे. मराठी भाषेचे अध्यापन करणाऱ्या प्राध्यापकांनी या बाबींचे अवधान ठेवायला हवे.' शुद्धलेखन व शुद्ध उच्चाराप्रमाणेच व्याकरणाचाही आग्रह अध्यापनप्रक्रियेशी जोडण्याचा विचार डॉ. सुरेश डोळके यांनी मांडला आहे. त्यांच्या मते भाषेला व्याकरणाच्या जोखडातून मुक्त करा ही हाकाटी व्यर्थ असून भाषा किंवा बोली ही विशिष्ट नियमांशिवाय राहूच शकत नाही. भाषाविषयक विविध अंगांचा सूक्ष्म व भेदक परामर्श डॉ. अ. द. वेलणकर ह्यांनी आपल्या भाषणात घेतलेला दिसतो. प्रमाणभाषेचा उगाच दुस्वास करणाऱ्या मंडळींना 'आचार्य' वेलणकरांनी व्यवस्थित 'गुरुमंत्र' दिला आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी व राष्ट्रसंत तुकडोजीमहाराजांनी आपल्या तेजस्वी विचारांच्या प्रसारासाठी प्रमाणभाषेचा वापर कसा यशस्वीपणे केला, याची आठवण त्यांनी करून दिली आहे. व्याकरणाच्या संदर्भात 'क्रियापदे' वगळून 'शॉर्टकट' लेखन करण्याविषयी त्यांनी आपल्या स्वतंत्र खुमासदार शैलीत नापसंती व्यक्त केली आहे.

अध्यापकांची कर्तव्ये आणि त्यांची व्यवसायनिष्ठा हासुद्धा मराठीच्या अध्यापनप्रक्रियेतील एक महत्त्वाचा पैलू असल्याचे ह्या विचारमंथनातून प्रकर्षाने जाणवते. अध्यापकाच्या निष्ठेवरच, त्याच्या कर्तव्यकठोर व्यवहारावरच यशस्वी अध्यापनाचा डोलारा उभा असल्याचे जवळजवळ प्रत्येकानेच कळवळून सांगितले






आहे. ह्यांतील काही मंडळी साहित्यिक म्हणून फारशी नावाजलेली नसतील, पण त्यांच्या अध्यापननिष्ठेला मात्र तोड नाही. त्यांच्या अध्यक्षपदाच्या बहुमानाचा खरेतर तोच एकमेव निकष आहे. डॉ. श्री. मा. कुलकर्णी, डॉ. अ. ना. देशपांडे, प्रा. भ. श्री. पंडित, डॉ. मदन कुलकर्णी, डॉ. वि. स. जोग डॉ. अ. द. वेलणकर इत्यादी मंडळी तर खासकरून त्यांच्या श्रेष्ठ अध्यापनशैलीसाठी सर्वश्रुत होती आणि आहेत. नागपूर विद्यापीठाच्या मराठी अध्ययन-अध्यापन क्षेत्राचा इतिहासच ह्या माणसांनी घडवला आहे. "आपणा सर्वांना मराठी भाषेविषयी अभिमान आहे आणि अध्यापनाविषयी जिव्हाळा आहे. 'हिचे पुत्र आम्ही' चा अभिमान आणि तिला 'वैभवाचे शिरी' बसविण्याची आकांक्षा हे आपल्या अध्ययनाचे व अध्यापनाचे स्थायिभाव आहेत. अध्ययन हा आपला धर्म आहे आणि अध्यापन ही आपली निष्ठा आहे.... शिक्षणपद्धती ही कालमानानुसार बदलत असली, तरी अध्यापनावरील निष्ठा हीच विद्यार्थ्यांच्या मनात मराठी भाषा व साहित्य यांच्याबद्दल गोडी निर्माण करू शकते", हे डोळक्यांचे चिंतन किंवा "....आपण साऱ्यांनी स्वप्नाळू आदर्शवादाच्या आहारी जाऊन नव्हे, तर प्रखर वास्तववादाच्या प्रकाशात शांत व्यवसायनिष्ठा अंगी बाणवली पाहिजे आणि समाजाला भुजा उभारून सांगितले पाहिजे की, विद्यापीठ आणि महाविद्यालय आणि आमचे वर्ग ही विचारांची प्रयोगशाळा आहे", हे द. भि. कुलकर्ण्यांचे प्रतिपादन म्हणजे एकप्रकारे सगळ्याच महनीयांच्या विचारांचा अर्क आहे. कालांतराने ही अध्यापननिष्ठा कशी कमी होत गेली, त्याची कारणे शैक्षणिक, अशैक्षणिक सामाजिक पर्यावरणात कशी आहेत, ह्याचाही ऊहापोह काहींनी, विशेषतः डॉ. अक्षयकुमार काळे यांनी, विस्ताराने केलेला दिसतो.

आदर्श अध्यापकाविषयीच्या विचारसूत्राला जोडून येणारे लगतचे विचारसूत्र म्हणजे आदर्श विद्यार्थ्यांचे! 'विद्यार्थी कसा असावा' इथपासून (डॉ. मा. गो. देशमुख) ते 'विद्यार्थी कसा नसावा' इथपर्यंत (डॉ. राजन जयस्वाल) सगळ्यांनीच आदर्श विद्यार्थ्यांच्या आपल्या कल्पना मांडलेल्या आहेत. चांगला, आदर्श, मनाजोगा विद्यार्थी सर्वांना हवाहवासा वाटतो; त्यामुळे तसा तो मिळत नसल्याची खंतही बहुतेकांनी व्यक्त केली आहे. परंतु जे आहे त्यातच चांगले निवडण्याचे व घडवण्याचे कार्य करावे हा आशावाद, ही सकारात्मक दृष्टी कुणीही बाजूला टाकलेली नाही. मला वाटते, 'आदर्श अध्यापकाचे' ते लक्षण आहे.

अभ्यासक्रमांची निर्मिती व त्यांचे यथायोग्य उपयोजन हा अध्यापनप्रक्रियेचा एक अविभाज्य घटक असतो. तो सर्वच काळांत, सर्वत्र एक वादविषयही असतो. अभ्यासक्रम निर्मिताना शुद्ध वाङ्मयीन दृष्टी असावी व राजकीय आदी अभिनिवेशांनी किंवा शिक्षणबाह्य प्रेरणांनी ते डागाळलेले नसावे, असा विचार या मंथनातून प्रकट झाला आहे.

अध्यापनाच्या शैलीविषयी महत्त्वाचे चिंतन इथे व्यक्त झाले आहे. केवळ एकमार्गी व्याख्यानपद्धती नसावी, असेच साऱ्यांना या संदर्भात वाटते. तिच्यात आवश्यक तेथे आधुनिक साधनांचा, तंत्रांचा आधार घ्यावा, असे डॉ. द.भि.कुलकर्णी व डॉ.काळे यांनी आवर्जून सांगितले आहे. मुलांना टेपरेकॉर्डवर ज्ञानदेव-तुकारामांचे अभंग ऐकवून त्यांवर विवेचन व भाष्य करण्याची आपली अध्यापनरीत डॉ. द. भि. कुलकर्णींनी सांगितली आहे. तिथपासून ते अगदी सद्यःस्थितीविषयी डॉ. जुल्फी शेख यांनीही नवनव्या साधनांच्या प्रभावी उपयोगाची गरज प्रतिपादित केली आहे. द. भि. कुलकर्णींनी मांडलेला या संदर्भातला 'द्विदल' शैलीचा मुद्दा उल्लेखनीय ठरावा. अध्यापन-शैलीत 'तर्केशुकर्कशमती' आणि 'काव्येपुरंजितवृत्ती' असा तर्कनिष्ठा-व्यासंग आणि रोचकता-रसाळपणा ह्यांचा समन्वय व सुंदर ताळमेळ असावा, असे ते सांगतात. 'व्याख्यानबाजीचे प्राधान्य असलेली अध्ययनपद्धती बदलली पाहिजे', असा मुद्दा अ. ना. देशपांडे यांनीही मांडला आहे.

पदवी व पदव्युत्तर पातळीवरील अध्यापन-कार्यासाठी असणारी रूढ शैक्षणिक पात्रता हा नेहमीच एक चर्चेचा विषय असतो. शालेय प्राथमिक स्तरापासून








ते कनिष्ठ महाविद्यालय स्तरापर्यंत अध्यापनशास्त्रीय अशा डी. एड. व बी. एड. पदव्या शिक्षकांसाठी अनिवार्य आहेत. परंतु पदवी व पदव्युत्तर स्तरावर मात्र केवळ सेट-नेट, एम. फिल्. किंवा पीएच. डी. या लेखनकौशल्याधारित पदव्याच पात्र ठरतात. पूर्वी तर केवळ एम्. ए. (५५% च्यावर) एवढीच पदवीस्तरावरील अध्यापनाची शैक्षणिक पात्रता होती. ज्या स्तराची सगळी शिस्त वाणीकौशल्यावर, वक्तृत्वावर आधारित आहे, व्याख्यानपद्धतीत ज्या पातळीवरचा एकमेव आधार आहे, नेमक्या त्याच पातळीवर अध्यापनकौशल्याचे शास्त्रीय शिक्षण घेण्याची आवश्यकता नाही, ही एक गंभीर गफलत आपल्या शिक्षणपद्धतीत राहून गेली आहे, असे वाटते. अनेक कथित गुणवत्ताप्रधान पात्रतायुक्त अध्यापक प्रत्यक्षात एक चांगला अध्यापक म्हणून का अयशस्वी होतात, ह्याचेही रहस्य याच गफलतीत दडलेले दिसते. अशा अध्यापकांच्या वक्तृत्वशैलीच्या अभावामुळे विद्यार्थी त्यांच्यापासून दूर पळतात आणि मग कालांतराने तेही विद्यार्थ्यांशी व वर्गखोल्यांशी अबोला धरतात, असे निदर्शनास येते. या संदर्भात प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांनी आपल्या भाषणात अशा प्राध्यापकाला स्वतंत्र प्रशिक्षणाची गरज नसून केवळ मार्गदर्शनाची गरज असल्याचे सांगितले आहे, तर डॉ. अक्षयकुमार काळे यांनी आपल्या भाषणात 'अध्यापनशास्त्रविषयक प्रमाणपत्र अभ्यासक्रम करणे अनिवार्य असले पाहिजे', असा एक मध्यममार्ग सुचवला आहे. मराठी अध्यापनविषयक विचारांमध्ये या मुद्द्यानुसार निर्णय घेण्याची वेळ आज आलेली दिसते.

मराठी भाषेवरील इतर भाषांच्या आक्रमणाची चिंताही मराठीच्या प्राध्यापकानेच सर्वाधिक केली पाहिजे, असा सूर काही भाषणांतून उमटलेला दिसतो. डॉ. डोळके यांनी हिंदीच्या आक्रमणाची बरीच उदाहरणे देऊन, आपल्या भाषणातील महत्त्वाचा वेळ आवर्जून ह्या मुद्द्याला देऊन मराठीच्या शुद्धीकरणाची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. इंग्रजीच्या आक्रमणाची चिकित्सा करताना डॉ. भांदककरांनी 'इंग्रजीचे स्तोम कुणी वाढवले?' असा अंतर्मुख करणारा प्रश्न शिक्षणव्यवस्थेला विचारला आहे. मराठीच्या समकालीन अवनत स्थितीची १) मराठी भाषेचा अभिमान नसणे, २) विज्ञानशिक्षणाचे महत्त्व आणि त्या शिक्षणाची इंग्रजीशरणता, ३) उत्कृष्ट साहित्यनिर्मिती नाही, ४) मराठीतील संशोधनप्रक्रियेला ओहोटी इत्यादी कारणे डॉ. काळे यांनी सांगितली असून शिक्षणक्षेत्रातील ह्या 'अराजका'ची इतर कारणे एकूण सामाजिक स्थितीत शोधली आहेत. डॉ. स्वान यांनी आजच्या भाषेच्या अध्ययन-अध्यापनापुढील प्रचंड आव्हानच आपल्या भाषणातून नेमकेपणाने उभे केले आहे. "इंटरनेटच्या महाजालात आणि दूरदर्शनच्या विविध चॅनल्सच्या भ्रमजालात आज जग गुरफटले गेले आहे. माहितीचा प्रचंड स्फोट झाला आहे आणि जग विलक्षण जवळ आले आहे. पण खरे आव्हान पुढेच आहे. या माहितीच्या धुराळ्यातून आपल्याला नेमके काय हवे ते शोधणे, येथेच आपले शिक्षकांचे खरे कार्यक्षेत्र सुरू होते", अशा शब्दांत ते हे आव्हान व्यक्त करतात. मराठी भाषेला ह्या सर्वच प्रकारच्या गदारोळातून बाहेर काढणे हे कधी नव्हे एवढे कठीण कार्य आजच्या मराठीच्या अध्यापकापुढे उभे ठाकले असल्याची जाणीव नव्वदनंतरच्या बहुतेक भाषणांतून आपल्याला होते. काही निश्चित व ठाम अशी उत्तरे नसली, तरी विचारांची एक दिशा मात्र त्यातून जरूर सूचित होते आणि हीच काळाची महत्त्वाची गरज आहे.

अध्यापनाचे आदर्श स्वत:पासून सुरू करावे लागतात, ही आत्मचिकित्सेची कठोर जाणीव ह्या सर्वच अध्यापकांमध्ये आहे. डॉ. द. भि. कुलकर्णी, आचार्य वेलणकर, डॉ. मदन कुलकर्णी ह्यांनी त्यामुळेच स्वत:च्या अनुभवांचे व स्वत:च्या अध्यापनप्रवासाचे कथन करतच आपली चिंतनसूत्रे मांडलेली दिसतात.

शिक्षकाने भाषाशिक्षक असतानाच लोकशिक्षकही असावे आणि वेळप्रसंगी आपली राजकीय-सामाजिक बांधिलकीही निर्भिडपणे व्यक्त करावी, असा एक वेगळा विचार डॉ. वि. स. जोग यांनी मांडला आहे. त्याचप्रमाणे वाङ्मयाची व अभ्यासविषयाची चिकित्सा करताना त्या विषयाच्या राजकीय-सामाजिक पार्श्वभूमीचीही त्याने निर्भिडपणे चिकित्सा केली पाहिजे,








असे त्यांचे प्रतिपादन आहे. या प्रतिपादनाशी एखादे वेळी कुणी सहमत होणार नाही; परंतु अध्यापकाने बोटचेपी व पळपुटी भूमिका घेऊ नये, हे यातून सूचित होणारे विचारसूत्र मात्र महत्त्वाचे ठरावे.

वैदर्भीय प्राध्यापक परिषदेच्या व्यासपीठावरून वैदर्भीय लोक-साहित्य संस्कृतीचा सार्थ अभिमानही वेळोवेळी व्यक्त झालेला दिसतो. डॉ. सुधाकर मोगलेवार, डॉ. राजन जयस्वाल ह्यांच्या भाषणांतून तो विशेषत्वाने व्यक्त झालेला आहे. मराठीच्या प्राध्यापकाचे अवतीभोवतीच्या लोकभाषांशी व संस्कृतीशी जिव्हाळ्याचे नाते असले पाहिजे, हे विचारसूत्रही तितकेच महत्त्वाचे ठरते.

मराठीच्या अध्यापनाची अनेक महत्त्वपूर्ण विचारसूत्रे अध्यक्षीय भाषणांच्या ह्या चिंतन-मंथनातून आपल्यापुढे साकारली आहेत. ज्येष्ठ आणि श्रेष्ठ अध्यापकांच्या ह्या चिंतन-मंथनाचे महत्त्व अधोरेखित करण्यासाठीच आणि हे 'पाथेय' लेखरूपाने सर्वांसमोर येण्यासाठीच केवळ हा प्रस्तुतचा लेखनप्रपंच.

**संदर्भ टिपा :**

१. म. सु. पाटील, 'साहित्य : अध्यापन आणि प्रकार' मौज-पॉप्युलर, १९८७, पृ. ८८.
२. स. शि. भावे, पृ. ४ (सर्वच संदर्भ उपरोल्लिखित पुस्तकातील आहेत.
३. सुधीर रसाळ, पृ. ३०.
४. रा. भा. पाटणकर, पृ. ३९.
५. गो. ग. कुलकर्णी, पृ. ५८.
६. गो. म. कुलकर्णी, पृ. ६९.
७. स. श्री. भावे, पृ. ८ ते १४.
८. सुधीर रसाळ, पृ. ३३.

**टीप** : 'नागपूर विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषद' ही संस्था १९६८ पासून वार्षिक अधिवेशने भरवीत असते. या अधिवेशनांतील अध्यक्षीय भाषणांचा संग्रह 'मराठीच्या अध्यापनाची विचारसूत्रे' या नावाने प्रसिद्ध झाला आहे. त्या ग्रंथावरून हा लेख सिद्ध केला आहे.

# ‘माऊली’ आणि ‘भातुकली’

माधवी देसाई

बा. सी. मर्ढेकर आणि ग्रेस हे दोन भिन्न प्रकृतींचे कवी आहेत. मर्ढेकर नवकवितेचे जनक. मर्ढेकरांची कविता मराठी कवितेला बहुआयामी आणि आशयसमृद्ध बनवून गेली. संतवाङ्मयाशी नाते सांगत मर्ढेकरांनी कवितेतून ईश्वररूपी सर्वसत्ताधीशाला शरण जात मानवतेच्या कळवळ्याची कविता गायिली. ऱ्हासशील मानवी समाजाचे विदारक दाहक वास्तव मांडतानाही त्यांच्या कवितेने मानवाच्या मंगलतेचे सूत्र कधी सोडले नाही. उलट, ग्रेस हे भावकवी आणि दुर्बोध कवी म्हणून ओळखले जातात. ग्रेस यांच्या कवितेचे केंद्र ‘स्त्री’ आहे. मर्ढेकर आणि ग्रेस यांच्या काव्यप्रवृत्तींत, प्रतिमासृष्टींत, काव्यकेंद्रांत पूर्णतः भिन्नता आहे. या उभय कवींच्या कवितेचा विचार समीक्षेच्या एकाच मोजपट्टीने करून चालणार नाही; तरीही या उभय कवींची नावे मी एकत्र घेण्याचे कारण म्हणजे त्यांच्या कवितेतील स्त्रीचित्रण आणि स्त्रीरूपे. मर्ढेकरांच्या कवितेत स्त्रीरूपे संख्येने अल्प असली, तरी ती आशयसमृद्ध आहेत. ग्रेस यांच्या समग्र कवितेचा विषयच ‘स्त्री’ असल्याने त्यांच्या कवितेत अगणित स्त्रीरूपे आहेत. त्यांतील काही स्त्रीरूपे आशयपूर्ण आहेत, तर काही स्त्रीरूपे गोठलेली आहेत; तर काही नाममात्रच आहेत. तरीही या लेखात उभय कवींची एक-एक कविता घेऊन त्यांचा तुलनात्मक विचार करण्याचे योजिले आहे.

पिंपात मेले ओल्या उंदीर, सर्वत्र रुटिन; जंतु, गिरणोदय इत्यादींसारख्या कविता लिहिणारे मर्ढेकर मृत्यूनंतरच समीक्षकप्रिय झाले. नव्या प्रतिमा, नवे शब्द, नवा आशय, नव्या शैलीसह कवितेत घेऊन येणाऱ्या मर्ढेकरांच्या कवितेत भावनात्मक मूल्यभाव आहे का? वात्सल्य आणि मातृवंदनादी भावभावना त्यांच्या कवितेत उत्कटतेने प्रत्ययाला येतात का? स्त्रीच्या शरीराची वर्णने मराठी कवितेत असंख्य आहेत; पण मर्ढेकर स्त्रीदेहाबरोबरच स्त्रीमनाचेही अचूक वर्णन काव्यबद्ध करतात का? आणि तसे ते करीत असतील तर, ग्रेस - – ज्यांच्या कवितेचे केंद्र फक्त ‘स्त्री’च आहे – त्यांच्या कवितेशी तुलना केली तर आपल्याला काय दिसते, उमजते आणि समजते, हा विचार अल्पसा स्पष्ट होईल, असे वाटते. असो. प्रथम बा. सी. मर्ढेकरांची कविता पाहू. कविता अशी,

पोरसवदा होतीस  
कालपरवापावेतो;  
होता पायांतही वारा  
कालपरवापावेतो.

आज टपोरलें पोट  
जैसी मोगरीची कळी;  
पडे कुशींतून पायीं  
छोट्या जीवाची साखळी

पोरसवदा होतीस  
कालपरवापावेतो;  
थांब उद्यांचे माऊली,  
तीर्थ पायांचे घेईतो.

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ४५.)

मर्ढेकरांची ही एक सुंदर, सुबोध कविता. कवितेत एका किशोरीच्या शारीरिक आणि मानसिक अवस्थेचे वर्णन मर्ढेकर करतात. पोरसवदा असलेली किशोरी पायात वारा भरल्यासारखी चंचल चपळ होती. अगदी कालपरवापर्यंत तिचे ते अल्लड अवखळ झऱ्यासारखे पळणारे, बागडणारे रूप कवी पाहत होता. ती किशोरी वयात येते; म्हणजे ऋतुमती होते. तारुण्याचा परीसस्पर्श तिला नवयौवना बनवितो; आणि तिच्या पायांतला वारा अधिकच चंचल होतो. भिरभिरे जसे वाऱ्यावर भिरभिरते तद्वत भिरभिरणारी नवयौवना विवाहिता होते तरीही तिची चपळता, चंचलता तशीच नवयौवनी आहे. पण ही

विवाहिता गर्भवती झाली आहे. मोगरीच्या कळीप्रमाणे तिचे पोट टपोरले आहे. त्यात तिला आनंदभावना वाटत असली तरी, तिच्या पायांतला वारा शांत झाला आहे. तिची पावले जडावली आहेत, मंद झाली आहेत; कारण तिच्या कुशीत वाढणाऱ्या छोट्या जिवाची नाजूक साखळी जणू तिच्या पायांत पडली आहे. हे नाजूक बंधन तिला हवेहवेसे वाटते आहे. त्यामुळेच तर ती गर्भातल्या जिवाची काळजी घेते आहे. कुशीतल्या गर्भाला जपताना तिची चाल आपोआपच मंद होते. मर्ढेकर शब्दांतून किती हळुवार होतात पहा; कारण या गर्भवती युवतीच्या पायांत 'छोट्या जिवाची' नाजूक साखळी आहे; ते साखळदंड नाहीत. त्यामुळे 'साखळी' ही प्रतिमा साजिवंत होते. पण मर्ढेकर इथे थांबत नाहीत. पुढे त्या नवयुवती गर्भवतीला उद्देशून म्हणतात,

"थांब उद्यांचे माऊली
तीर्थ पायांचे घेईतो."

ही गर्भवती उद्या म्हणजे प्रसूत झाल्यावर 'माऊली' 'आई' होणार आहे. पण ती आता निरंतर माऊलीच राहणार आहे. म्हणून मर्ढेकरांनी 'उद्याचे' असे न म्हणता 'उद्यांचे' असा अनेकवचनी शब्दप्रयोग केला आहे. शब्दाच्या बाबतीत मर्ढेकर किती दक्ष, चोखंदळ आणि साक्षेपी होते, याचा इथे प्रत्यय येतो. बालिका-किशोरी-ऋतुमती-नवयौवना-विवाहिता-गर्भवती हा प्रवास मर्ढेकरांनी अल्पाक्षरी केला आहे. स्त्रीची ही सर्वच रूपे सौंदर्यपूर्णच असतात; पण स्त्रीचे माऊली हे रूप मात्र सर्वांगसुंदर आहे. त्याला दिव्यस्पर्श आहे. ईश्वराला, संतांना माऊली म्हणतात; पण माऊलीला ईश्वर म्हणत नाहीत, संतही म्हणत नाहीत. असे हे माऊलीचे रूप मर्ढेकरांना वंदनीय आहे. आज गर्भवती असलेली स्त्री 'उद्यांची माऊली' आहे म्हणूनसुद्धा त्यांना ती वंदनीय वाटते. म्हणून तिच्या पायांचे तीर्थ घेण्यासाठी ते स्वतः विनम्र होऊन खाली वाकताना गर्भवतीला क्षणभर थांबायला सांगतात. उद्यांची माऊली आजही वंदनीय आहे, उद्याही आणि निरंतर काळासाठी वंदनीय आहे. अंतिमतः स्त्रीचे महानत्व कवीने सन्माननीय, वंदनीय मानले आहे. कवितेत स्त्रीत्वाचा, मातृत्वाचा सन्मान आहे, पूजन आहे, स्त्रीच्या शारीरिक बदलाचा चढता आलेख शेवटी 'मातृत्वा'चे शिखर गाठतो. स्त्रीच्या शरीराकडून तिच्या मनाकडे, वात्सल्याकडे जाणारा हा तसा लांबचा प्रवास मर्ढेकरांनी अल्पाक्षरबव्हर्थक करून स्वतःमधील मातृभक्ताचे दर्शनही घडविले आहे. मर्ढेकरांच्या कवितेत एक प्रकारचा सततचा कडवटपणा असतो, असे पु. शि. रेगे म्हणतात; पण या कवितेत कुठेही कडवटपणाचा लवलेशही नाही. उलट, 'टपोरलेली मोगरीची कळी' ही पुष्पप्रतिमा प्रतिपाद्याला सुगंधित करते. पायांतला 'वारा' आणि गर्भवती झाल्यानंतरची स्त्रीची मंद चाल यांतील विरोधलयीतून एक शरीर-परिवर्तनाचा प्रवास मर्ढेकरांनी काव्यमय केला आहे. स्त्रीच्या मनातील तारुण्याच्या नवसंवेदना, शृंगारभावना आणि वात्सल्यभावना मर्ढेकरांनी टिपून त्याची एक सुंदर कमान रचली आहे. गर्भवती ही प्रतिमा मर्ढेकरांची आवडती प्रतिमा असावी; कारण मुंबईचे वर्णन करतानाही त्यांनी ही प्रतिमा वापरली आहे. मर्ढेकर लिहितात,

"न्हालेल्या जणुं गर्भवतीच्या
सोज्वळ मोहकतेने बंदर
मुंबापुरिचें उजळित येई
माघामधली प्रभात सुंदर."

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ६६.)

असो. हे थोडेसे विषयांतर होईल; पण ते 'गर्भवती' या प्रतिमेच्या अनुषंगानेच आहे.

कवितेच्या वर्ण्यविषयापासून, प्रयोजनापासून मर्ढेकर जराही दूर जात नाहीत, ढळत नाहीत. विषयसंगत आणि संगती कधीच सोडीत नाहीत. एक मोहक, चिरेबंद रचना मर्ढेकर बांधतात, हे आपल्याला या कवितेतून प्रत्ययाला येते. मर्ढेकरांच्या या कवितेचे केंद्र 'माऊली' आहे. स्त्री-शरीर-शास्त्रीय प्रवासाचे मर्ढेकरांनी एक रमणीयार्थ प्रतिपादक काव्य केले आहे. असो. आता ग्रेसच्या कवितेकडे जाऊ. कविता अशी–

**भातुकली**

खेळवेडे होते
माझे बालपण
पाण्याचे वरण
वाढायाची.
माऊलीचे नेसू
गुंडाळीत होती










नाकाहून मोती
जड जसा.
जड झाला मोती
त्याची केली नथ
पंढरीचा नाथ
त्याच्यासाठी.
आले मला न्हाण
उसविल्या वेशी
तरी विटाळशी
जगासाठी.

(चंद्रमाधवीचे प्रदेश. पृष्ठ २६.)

ग्रेस यांची 'भातुकली' या शीर्षकाची ही सुंदर सुबोध कविता आहे. या कवितेतही कवीने स्त्रीच्या शरीरपरिवर्तनाचा प्रवास शब्दबद्ध केला आहे. हा प्रवास बालिकेपासून सुरू होतो आणि नवयौवनेपर्यंत जाऊन थांबतो. खेळवेडी चिमुरडी भातुकलीचा खेळ खेळते. खेळणपीठाचे पाणी ती 'वरण' म्हणून वाढायची. आपल्यापैकी बहुतेक जण/जणी बालपणी भातुकलीचा खेळ खेळले असतीलच. पुरुषवर्गाने बालपणी आपल्या धाकट्या बहिणीच्या भातुकलीच्या खेळामधले 'खेळणपीठ' तर दादागिरी करून नक्कीच फस्त केले असेल. ..... असो. तर ही बालिका भातुकली खेळताना आईचे अनुकरण करते. पण केवळ स्वयंपाकाचेच अनुकरण करते असे नाही, तर आईच्या वेषभूषेचेही अनुकरण करते आहे. आईचीच साडी म्हणजे कवितेतील 'नेसू' गुंडाळते आहे. तिच्या इवल्याशा बालदेहावर ती 'नेसू'-ची साडी खूपच मोठी होते. त्याचे सुंदर वर्णन करताना ग्रेस म्हणतात, "नाकाहून मोती जड जसा." मोठ्या खुबीने ग्रेस नाकातल्या मोत्याकडे वळतात. हा मोती जड झाला म्हणजेच बालिका आणखी मोठी झाली आणि मोत्याची नथ तिने नाकात घातली. पण ही नथ मात्र फक्त 'पंढरीच्या नाथा' साठी म्हणजे विठ्ठलासाठीच आहे. इथे कवितेत ईश्वराप्रती असलेली शृंगारभावना/मधुराभक्ती आणि शारीरिक समर्पण आहे. आपल्याला वाटते, कविता संपली. पण तसे नाही. आपण कवितेच्या मध्यावर आहोत. कवितेच्या पहिल्या/आद्य भागात येणाऱ्या आशयाशी हा कवितेचा मध्यभाग सुसंगती साधतो. या ठिकाणी या कवितेचे निवेदनाचे स्वरूप संपते आणि आपण कवितेच्या अंतिम भागाकडे येतो. कवितेचे शेवटचे कडवे मात्र आत्मनिवेदनाच्या स्वरूपात येते. कवितेतली ऋतुमती झालेली नवयुवती नायिका शेवटच्या कडव्यात म्हणते,

"आले मला न्हाण
उसवल्या वेशी
तरी विटाळशी
जगासाठी."

मुलीला 'न्हाण' येते तेव्हा ती 'ऋतुमती' होते, वयात येते. ही एक शरीरशास्त्रीय नैसर्गिक घटना आहे. वनस्पतिशास्त्रीय भाषेत तिच्यातील कलिकेचे फूल होते. ऋतुमती झालेल्या तरुणीच्या भावसंवेदनांना, जाणिवांना फुलपाखरांचे रंग लाभतात. 'तारुण्य' हा जीवनातील अतिरम्य काळ असतो. स्त्रीच्या जीवनातल्या एका सुंदर 'तरुणपर्वा'ला तिच्या ऋतुमती होण्याने, कवितेतील 'न्हाण' येण्याने सुरुवात होते. ती विवाहयोग्य, विवाहोत्सुक होते. माता होण्यासाठी असलेली सक्षमता तिला प्राप्त होते. ती सृजनशील होते. इतक्या सगळ्या सौंदर्यपूर्ण गोष्टी म्हणजे तारुण्य.... त्याचा प्रारंभ तिला 'न्हाण' येण्याने होतो. पण हे परिवर्तन होतानाही तिला रक्तस्रावाच्या वेदना सोसाव्या लागतात; कळा सोसाव्या लागतात. तिच्या 'वेशी उसवल्या... ' त्या याच अर्थाने. या वेदना सोसून तिला नवतारुण्याची झळाळी प्राप्त होते. पण ही नायिका म्हणते की, माझ्या या नव्हाळीकडे न पाहता, त्यातील नवचैतन्याकडे जग दुर्लक्ष करते आणि ते तिला 'विटाळशी' म्हणजे अपवित्र, अस्वच्छ म्हणते, याचे तिला दुःख होते आहे. ते ' ... तरी विटाळशी' या शब्दांतून व्यक्त होते. नेमके हेच दुःख या कवितेच्या शेवटच्या भागात काव्यबद्ध केले आहे. एका बालिकेचा तारुण्यापर्यंतचा देखणा प्रवास ग्रेस यांनी अत्यंत सुबोध प्रसन्न शब्दांत चितारला आहे. असो.

आता मर्ढेकर आणि ग्रेस यांच्या कवितांचा एकत्रित विचार करू.

मर्ढेकरांनी बालिका ते माता हा स्त्रीरूपांचा प्रवास मांडताना मातृत्वाबद्दलचा पूज्यभाव आणि स्त्रीविषयीचा सुसंस्कृत दृष्टिकोणही अभिव्यक्त केला आहे. मर्ढेकरांच्या कवितेतून एक निश्चित दिशा, निःसंदिग्ध दृष्टिकोणही

अनुक्रमणिका

दिसतो. काव्याचे प्रयोजन, उद्दिष्ट निश्चित आहे. नीतिमूल्यांचे उद्ध्वस्तीकरण झालेल्या ऱ्हासशील मानवी जीवनाचे अगतिक, भीषण चित्रण करणारे मर्ढेकर या कवितेत हळुवार, नम्र बनले आहेत. स्त्रीच्या देहाचे, मनाचे आणि उत्कट वात्सल्यभावाचे एक प्रसन्न सुंदर मिश्रण या कवितेच्या चिरेबंद रचनेतून साकारते.

मुलगी/किशोरी 'ऋतुमती' होते हा स्पष्ट उल्लेख न करता मर्ढेकरांची 'पायांतील वारा' ही प्रसरणशील प्रतिमा अर्थाचा परिसर व्यापक बनविते आणि ऋतुमती झाल्यावरही भिरभिरणारा वारा, गर्भवती झाल्यावर शांत होतो, ही सूचकताही मोहक होते. विठ्ठल वाघ म्हणतात, "कर्णाला जशी कवचकुंडले जन्मतःच होती, तशी कवितेच्या जन्माबरोबरच प्रतिमा, प्रतिके येत असतात. एखादी गोष्ट, जिच्या आधाराने भावना व्यक्त करायची असते तो आधार अवतीभवती असतो, तिला प्रतिमा म्हणतात. त्यात सूचकता असते म्हणूनच कविता असते किंवा कविता नसते." [१] येथे मर्ढेकरांच्या प्रतिमा प्रसरणशील, अर्थसंपृक्त आहेत म्हणून कविता बडबडत नाही, तर तीं अल्पाक्षरबव्हर्थक रमणीय होते.

आता ग्रेसच्या कवितेकडे वळू या.

"ग्रेसने ही 'भातुकली' कविता जनाबाईसाठी लिहिली आहे." [२] असे दभि. सरांशी चर्चा करताना त्यांनी म्हटले होते. या कवितेचे जे तिसरे कडवे आहे ते नंतर लिहिले व कवितेत समाविष्ट केल्याचा संदर्भही दभि. सरांनी दिला होता. या कवितेविषयी जयंत परांजपे लिहितात, "चंद्रमाधवीचे प्रदेश'मध्ये भातुकली या शीर्षकांतर्गत प्रसिद्ध झालेली जनाबाईवरील कविताही अशी साधी सरळ आहे." [३] दि. १ जाने २०११ रोजी मला खुद्द ग्रेस यांचा फोन आला होता. त्या वेळी ते म्हणाले, "मॅडम, तुम्हाला आवडलेल्या कवितांपैकी एखादी कविता मला म्हणून दाखवाल का?" [४] त्या वेळी मी हीच कविता त्यांना म्हणून दाखविली होती. त्या वेळी आनंदाने ते म्हणाले, "वा! मलाही माझी ही कविता खूप आवडते." असो. मला इथे फक्त एवढेच सांगायचे आहे की, जयंत परांजपे यांचे, 'ही कविता ग्रेस यांनी जनाबाईसाठी लिहिली आहे', हे विधान ग्रेस यांनी कुठेही अमान्य केले नाही. उलट, जयंत परांजपे माझ्या कवितेचे साहित्यशरणतेने विवेचन करतात/समीक्षा करतात, असे ग्रेस म्हणत.

आता जयंत परांजपे यांच्या म्हणण्यानुसार आपण 'भातुकली' कवितेकडे जाऊ.

जनाबाई या कुणबीण. लहानपणीच त्यांच्या आई-बापाने ('दमा' आणि 'करूंड') त्यांना नामदेवांच्या घरी आणून सोडले. जनाबाई तिथे दासी म्हणूनच वाढल्या, मोठ्या झाल्या. जनाबाईंचे पोरके बालपण आणि काबाडकष्ट उपसणारे त्यांचे किशोरवय, तरुणवय आणि प्रौढवय एकाकीपणात, एकटेपणातच गेले. 'जनी नामयाची रंगली कीर्तनी' हे त्यांचे दिव्य व्यक्तित्व, स्त्रीत्व आणि संतत्व यांचा विचार वेगळ्या संदर्भात करावा लागेल. जनाबाईंच्या वर उल्लेखिलेल्या लौकिक चरित्राचा, नित्य कष्टमय जीवनाचा विचार करताना, जनाबाईंना 'भातुकली' खेळायला मिळाली असेल का, ज्या माऊलीने जनाबाईंना त्यांच्या बाल्यावस्थेतच नामदेवांच्या घरी सोडून दिले. त्या 'माऊलीचे नेसू' नेसायला मिळाले असेल का? कारण जनाबाई म्हणतात,

"आई मेली, बाप मेला
आता सांभाळी विठ्ठला।।"

अशा अवस्थेत जगताना भातुकलीचा खेळ आणि खेळणपीठ मिळणे, माऊलीचे नेसू गुंडाळावयाला मिळणे, त्यामागे असणारे माऊलीचे प्रेम जनाबाईंच्या आईकडून मिळणे या सगळ्याच बाबी जनाबाईंसाठी अप्राप्य होत्या. आईवडिलांकडून प्रेम मिळाले नाही; मग मोती, नथ या गोष्टी तर दूरच. पण पंढरीचा नाथ मात्र जनाबाईंचाच होता. एवढी एक प्रतिमा सोडली तर ही कविता जनाबाईंसाठी असू शकत नाही, याचा पुरावा किंवा दाखला या कवितेचे शेवटचे कडवे देऊन जाते. कारण या चौथ्या कडव्यात वेशी उसवून न्हाण आलेल्या/ऋतुमती झालेल्या नवयौवनेचे दुःख व्यक्त होते; कारण तिला 'विटाळशी' म्हटले जाते या कारणासाठी. पण जनाबाईंच्या अभंगातून या दुःखाचा कुठेही उल्लेख येत नाही. इतकेच नाही, तर या निरक्षर जनाबाईंनी सर्व स्त्रियांना उपदेशच केला आहे की, "स्त्रीजन्म म्हणुनि न व्हावे उदास।"— या पार्श्वभूमीवर, 'ग्रेस यांनी ही कविता जनाबाईंसाठी लिहिली', हा जयंत परांजपे यांचा विचार चुकीचा ठरतो.

ग्रेस यांच्या समग्र कवितेचे केंद्र 'स्त्री' आहे. या

'भातुकली' कवितेचे केंद्रही स्त्रीच आहे. पण कवितेचे प्रयोजन मात्र निश्चित नाही. वर्णन करावयाचे आहे ते ऋतुमती नवयौवनेचे. पण कविता मात्र जनाबाईंवर केली आहे. असा कवितेचा भरकटलेला प्रवास असला तरी कविता सुंदर, सुबोध आहे याबाबत वाद असू नये. जर ही कविता जनाबाईंचा संदर्भ घेऊन वाचली तर कवितेची आंतरिक लय हरवते, बिघडते. कवितेचे प्रवाहीपण, ओघवतेपण बाधित होते, पण कवितेचे चित्रमालिकेत रूपांतर होते, ते असे – पहिले चित्र. भातुकली खेळणाऱ्या गोड, निरागस बालिकेचे. दुसरे चित्र, आईचे नेसू गुंडाळून आईचे अनुकरण करणाऱ्या आणि नटू पाहणाऱ्या किशोरीचे. तिसरे चित्र मधुराभक्ती करणाऱ्या संत, स्त्रीसंत किंवा जनाबाईंचे आणि चौथे चित्र ऋतुमती झालेल्या पण दु:खी नवतरुणीचे. अशी ही कवितेतील चित्रमालिकाही प्रेक्षणीय, आनंददायी आहे, हेही खरे; पण ग्रेस यांची कविता सलग एकसंध अनुभूती देत नाही, या समीक्षकांच्या मताला कविताही होकार देत राहते. कविता चित्रदर्शी आहे. पण कवितेचे प्रयोजन संदिग्ध आहे. ग्रेस यांची वर्णनशैली वेधक आहे, पण कवितेची रचना चिरेबंद नाही. साहजिकच आशयाची एकसंध अनुभूती किंवा अन्वयसलगता व्यक्त होत नाही. पण चार सुंदर स्त्रीरूपे मात्र कवितेत चितारली आहेत. दु:खजाणीव, मग ती कोणतीही असो, ती ग्रेस यांच्या कवितेत असतेच. स्वत:स ते 'मी महाकवी दु:खाचा' म्हणवून घेत. या कवितेतही शेवटच्या कडव्यात स्त्रीदु:ख व्यक्त झाले. मर्ढेकरांनी मात्र एक निखळ प्रसन्न काव्यानुभव देताना त्यांच्या बव्हंशी कवितेत येणारा कडवटपणा या कवितेत टाळला आहे. पण ग्रेस यांच्या प्रत्येक कवितेत दु:खजाणीव अटळ असतेच; इथे या 'भातुकली' कवितेतही ती शेवटी येते.

'माऊली' आणि 'भातुकली' (मर्ढेकरांच्या कवितांना शीर्षके नसतात. पण त्यांच्या 'पोरसवदा होतीस...' या कवितेत 'माऊली' ही केंद्रप्रतिमा आहे म्हणून लेखाच्या सोयीसाठी मी या कवितेचा उल्लेख 'माऊली' असा केला आहे.) या दोन कवितांचा आपण अल्पसा विचार केला. मर्ढेकर आणि ग्रेस यांच्या स्त्रीविषयक जाणिवा आणि स्त्रीविषयक दृष्टिकोण त्यांच्या कवितांतून व्यक्त होतातच; पण त्यांच्या काव्यप्रयोजनांतील, काव्याविष्कारांतील मोठी तफावतही लक्षात येते. मर्ढेकरांचे काव्यप्रयोजन निश्चित आहे आणि शेवटपर्यंत ते प्रयोजन कुठेही भरकटत नाही. आशयानुभूती-आविष्काराची एकसंधता कवितेला कलाकृती बनवते. कवितेच्या नायिकेच्या भावसंवेदना, भावानुभूती सार्वकालिक होतात. मातृत्व, सृजनजाणीव आणि वात्सल्यभाव वैश्विक बनतो. ग्रेस यांच्या कवितेच्या नायिकेचे दु:ख शारीरपातळीवरचे आहे. तिच्या दु:खात 'देहजाणीव' केंद्रस्थानी येते, तर मर्ढेकरांच्या कवितेच्या नायिकेचा मातृत्वाचा आनंद आणि कवीची मातृवंदना केंद्रस्थानी येते. दोन्ही कवितांत स्त्रीदेहाच्या परिवर्तनाचा प्रवास आहे; पण मर्ढेकरांच्या कवितेचा प्रवास देहाकडून मनाकडे, भावविश्वाकडे आहे. ग्रेस यांच्या कवितेचा प्रवास देहाकडून देहाकडे आहे.

**संदर्भ :**

१. वाघ विठ्ठल – ॲकॅडमिक स्टाफ कॉलेज, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती येथे दि. ११।३।२०१४ रोजी दिलेले व्याख्यान.

२. कुलकर्णी द. भि – ग्रेस यांच्या कवितेविषयी द. भि. सरांशी झालेली चर्चा.

३. परांजपे जयंत – ग्रेस आणि दुर्बोधता, विजय प्रकाशन, नागपूर. प्रथम आवृत्ती, पृष्ठ १७.

४. ग्रेस यांच्याशी झालेली बातचित.

# गो. म. कुलकर्णी यांनी केलेली नाट्यसमीक्षा

विनायक गंधे

गेल्या शतकाच्या उत्तरार्धात प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी लेखनास प्रारंभ केला आणि त्या शतकाच्या अखेरपर्यंत ते लेखनमग्न राहिले. मराठी साहित्याचा विचार प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी जवळजवळ अर्धशतक केला आणि त्यांच्या चिंतनातून सकस, विचारप्रवर्तक समीक्षा आकाराला आली. या चिंतनातून प्रकट होणारे गो. म. कुलकर्णी ऋजू व्यक्तिमत्त्वाचे, अनाग्रही पण चिकित्सक असे समन्वय वृत्तीचे समीक्षक आहेत. त्यांच्या लेखनाचा आवाका मोठा आहे. प्राचीन-अर्वाचीन अशा समग्र मराठी साहित्याचा धांडोळा गो. म. कुलकर्णी यांनी घेतला आहे. संतसाहित्यापासून दलित साहित्यापर्यंत सर्व वाङ्मयप्रवाहांची, मराठीतील जवळजवळ सर्व साहित्यप्रकारांची, नवसाहित्याची, त्यातून निर्माण होणाऱ्या अनेक प्रश्नांची त्यांनी आस्थेने आणि गांभीर्याने दखल घेतली आहे. त्या प्रश्नांची उकल करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी प्राचीन साहित्यातील शाश्वत मूल्यांचा जसा पुरस्कार केला आहे, तसे नव्या जाणिवांचे, प्रयोगांचे स्वागतही केले आहे. प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्या सर्वच समीक्षालेखांतून त्यांच्या मनाचा ताजेपणा, स्वागतशीलता व मूल्यशोधक दृष्टी जाणवते.

प्रा. कुलकर्णी यांचे बरेचसे समीक्षालेखन स्फुट स्वरूपाचे आहे. त्यातही ग्रंथपरीक्षण हे त्यांच्या समीक्षालेखनाचे खास वैशिष्ट्य होय. मौलिक विचार देणारे त्यांचे काही लेख मराठीतील महत्त्वाच्या साहित्यकृतींची परीक्षणे आहेत. उदा., 'मराठी कादंबरी : पहिले शतक' या कुसुमावती देशपांडे यांच्या ग्रंथावरील त्यांचे परीक्षण. "ग्रंथपरीक्षण हा कष्टाचा व व्यासंगाचा भाग आहे. पण आपल्याकडे अव्वल दर्जाच्या परीक्षण-लेखापेक्षा दुय्यम दर्जाच्या स्वतंत्र लेखाला महत्त्व देण्याची प्रवृत्ती आहे" [१], अशी खंत प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी डॉ. विद्याधर पुंडलिक आणि डॉ. आनंद यादव यांना दिलेल्या एका मुलाखतीत प्रकट केली आहे.

मराठी नाट्यसृष्टीचा गो. म. कुलकर्णी यांनी जो विचार केला आहे, त्यातील काही लेखन हे ग्रंथपरीक्षणाच्या स्वरूपातील आहे. पण त्यातून प्रकट झालेले चिंतन मौलिक स्वरूपाचे आहे.

'मराठी नाट्यसृष्टी' या त्यांच्या ग्रंथात त्यांचे नाट्यविषयक चिंतन प्रकट झाले आहे. गडकरी, शिरवाडकर, तेंडुलकर यांची नाटके जशी त्यांच्या चिंतनाचा विषय आहेत, तशी मराठी दलित रंगभूमीही त्यांच्या चिंतनाचा विषय बनली आहे. बालगंधर्व आणि तत्कालीन रंगभूमी हा त्यांच्या कुतूहलाचा विषय आहे. "बालगंधर्व हा अगदी क्वचित घडून येणारा चमत्कार (Phenomenon) आहे. त्यामुळे या चमत्काराचे तार्किक पद्धतीने अंतिम विश्लेषण करणे फारच कठीण",[२] असे गो. म. कुलकर्णी भारावून म्हणतात. पुढे याची मीमांसा करताना ते किर्लोस्करी नाट्यपरंपरा उलगडून दाखवितात. बालगंधर्वांच्या कर्तृत्वाबद्दल गोमंनी निष्कर्ष काढला आहे की, "परंपरापालन करूनही या परंपरेच्या चौकटीत नवसर्जन घडवून आणता येते, याचे वस्तुपाठच गंधर्वांनी दिले." [३] देवलांच्या समग्र नाट्यकर्तृत्वाचा आढावा घेऊन त्यांनी देवलांच्या 'शारदा' व 'संशयकल्लोळ' या नाटकांचा सर्वांगीण परामर्श घेतला आहे. देवलांच्या 'शारदे' मुळेच मराठी नाट्यसृष्टीत वास्तववादी सामाजिक नाटकांचा खराखुरा पाया घातला गेला,[४] असे गो. म. कुलकर्णी यांना वाटते. 'संशयकल्लोळ' नाटकाच्या निमित्ताने त्यांनी सुखात्मिका या रूपबंधाची चर्चा केली आहे.

'नाटककार खाडिलकर : एक अभ्यास' हा गो. म. कुलकर्णी यांचा परीक्षणलेख आहे. पण या लेखाचा आवाका खूपच मोठा आहे. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्या प्रस्तुत ग्रंथाचे हे परीक्षण आहे. या परीक्षणातून गो. म. कुलकर्णी यांनी नाट्यविषयक अनेक प्रश्न उपस्थित केले आहेत व काही प्रश्नांच्या संदर्भातील आपले आकलन मांडले आहे. गोमंनी लेखाच्या प्रारंभीच

अनुक्रमणिका

काही प्रश्न उपस्थित केले आहेत व काही प्रश्नांच्या संदर्भातील आपले आकलन मांडले आहे. उदा., खाडिलकरांनी पतकरलेली परंपरा कोणती? किंवा परंपरापूत खाडिलकरांनी शेक्सपिअरसारख्या परकीय लेखकाचे तंत्र का स्वीकारले, वगैरे.

खाडिलकरांनी गंभीर प्रकृतीच्या नाटकात थिल्लर विनोदाची भेसळ केली, हा प्रा. वा. ल. कुलकर्णी यांना खाडिलकरांचा मोठा दोष वाटतो. पण या दोषाची खोलवर तपासणी वालंच्या लेखनात आढळत नाही. या संदर्भात प्रा. गो. म. कुलकर्णी यांना असे वाटते की, खाडिलकरांनी विनोदाच्या बाबतीत संस्कृत नाटकातील विदूषकनिष्ठ परंपरेचा कित्ता गिरविला. खाडिलकरांच्या उत्तरकालीन नाटकांना अवकळा का आली, याची वा. ल. कुलकर्णी यांनी केलेली मीमांसा गोमंना असमाधानकारक वाटते. वा. ल. कुलकर्णी खाडिलकरांच्या ज्या विचारसरणीला 'गांधी तत्त्वज्ञान' म्हणतात ते गो. म. कुलकर्णी यांना 'भारतीय तत्त्वज्ञान' वाटते. वा. ल. कुलकर्णी खाडिलकरांच्या नाटकात विचारनाट्य आहे असे म्हणतात. त्याचीही गो. म. कुलकर्णीकृत मीमांसा वेगळ्या स्वरूपाची आहे. खाडिलकरांच्या नाटकात विचारांच्या नवतेपेक्षा परंपरापूत विचारांचे कालसापेक्ष असे नवे स्पष्टीकरण आढळते, असे गोमंचे म्हणणे आहे. या परीक्षणाच्या अखेरीस गो. म. कुलकर्णी यांनी एकूणच मराठी नाटकांबद्दलचा आपला अभिप्राय नोंदविला आहे. तो म्हणजे शेक्सपिअरच्या नाट्यतंत्राचा मराठी नाटकांवरील प्रभाव बव्हंशी बाह्य स्वरूपाचा आहे. शेक्सपिअरचे अंतर्भेदी तत्त्वचिंतन, काव्यात्मता मराठी नाटककारांना पेलता आली नाही.[५]

'आधुनिक मराठी नाट्यसाहित्यातील एक गुरुशिष्यसंबंध' हा त्यांचा दीर्घ लेख गडकरी आणि कोल्हटकर या दोघांच्याही नाट्याभ्यासकांना उपयुक्त ठरणारा आहे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनी, **के. वा. साठे** यांना लिहिलेल्या १९२३ सालच्या अप्रकाशित पत्राच्या आधारे गोमंनी कोल्हटकर-गडकरी संबंधावर मार्मिक प्रकाश टाकला आहे.[५] हे पत्र गो. म. कुलकर्णी यांना अनेक अंगांनी महत्त्वाचे वाटते. या पत्रात कोल्हटकरी संप्रदायाची लक्षणे आणि स्वतःच्या नाट्यलेखनाचे विशेष कोल्हटकरांनी सांगितले आहेत. त्याचप्रमाणे, कोल्हटकरांनी गडकऱ्यांच्या सामर्थ्याचे व वैगुण्यांचेही दिग्दर्शन केले आहे. गडकऱ्यांच्या होत असलेल्या आंधळ्या अनुकरणाबद्दल व गडकऱ्यांच्या एकांगी गौरवाबद्दल सडेतोड उद्गार काढले आहेत. पुरोगामी सामाजिक विचारांचे आकर्षण, विदग्ध विनोद, बौद्धिक विश्लेषण आणि वाङ्मयानंदात रमणे हे कोल्हटकर आणि गडकरी यांच्यातील दुवे असल्यामुळे गडकऱ्यांनी काही प्रमाणात कोल्हटकरांचे अनुकरण का केले, यावर प्रकाश पडतो, अशी गो. म. कुलकर्णी यांची मीमांसा आहे. पण कोल्हटकर आणि गडकरी यांच्या प्रकृतीत साम्यापेक्षा विरोध जास्त होता. ही विरोधस्थळे गो. म. कुलकर्णी यांनी सांगितली आहेत. गडकरी कोल्हटकरांप्रमाणे केवळ सुधारकी वृत्तीचे नव्हते; ते सनातनीही होते. वर्तमानकाळाइतकेच त्यांना भूतकाळाचे, इतिहासपुराणांचे आकर्षण होते. गडकरी वरवर सिनिक पण अंतर्यामी श्रद्धाशील होते. याउलट कोल्हटकर होते. भावनावेग, झोकून देण्याची वृत्ती कोल्हटकरांमध्ये नव्हती. कोल्हटकरांच्या लेखनात अंतर्मुखतेचा, आत्मशोधाचा, तल्लीनतेचा अभाव होता; त्यामुळे मराठी साहित्याचे तेज, भव्यता कोल्हटकरांच्या लेखनाला लाभली नाही, असे विश्लेषण गो. म. कुलकर्णी यांनी केले आहे. गडकरी वाङ्मयाच्या अभ्यासाच्या नव्या दिशा या लेखाने सूचित केल्या आहेत.

कन्नड लेखक टी. पी. कैलासम आणि गडकरी यांच्या नाट्यलेखनाचा तौलनिक अभ्यास करून गो. म. कुलकर्णींनी आपली काही निरीक्षणे प्रस्तुत लेखात मांडली आहेत. पौराणिक व्यक्तिरेखांवर आधारित असे कैलासम यांचे नाट्यलेखन आहे. गडकरी आणि कैलासम समकालीन आणि समानधर्मी होते. दोघेही कलंदर वृत्तीचे, कोटिबाज, प्रत्युत्पन्नमती आणि जीवनाच्या गहिऱ्या शोकसंकुलतेने व्याकूळ झालेले होते, असे गो. म. कुलकर्णी म्हणतात. त्यांना गडकरी आणि कैलासम या दोघांच्या वाङ्मयीन प्रकृतींत विलक्षण साम्य वाटते. गडकऱ्यांची वृत्तिप्रवृत्ती कैलासम यांच्याप्रमाणे पुराणसृष्टीशी सहजपणे तादात्म्य पावणारी होती. नव्या मिथ्स निर्माण करणारी गडकऱ्यांची शक्ती मोठी होती.

पण तिच्या विकासाला पुरेसा अवसर मिळाला नाही, असे गोमंना वाटते. गडकरी आणि कैलासम या दोघांच्याही जीवनसृष्टीत त्यागवृत्तीला, ब्रह्मार्पणवस्तुभावाला महत्त्व होते. असे असले तरी या दोघांच्या प्रकृतीतील काही भिन्न विशेषांमुळे त्यांची नाट्यसृष्टी कशी वेगळी ठरली, याचे साधार विवेचन गो. म. कुलकर्णी यांनी प्रस्तुत लेखात केले आहे. नाटक आणि रंगभूमी यांच्या तौलनिक अभ्यासाला नवी दिशा देणारा असा हा लेख आहे.

शिरवाडकरांच्या 'दुसरा पेशवा' या नाटकाच्या निमित्ताने गो. म. कुलकर्णी यांनी शिरवाडकरांच्या नाटकांबाबत आपले निरीक्षण मांडले आहे. काव्य आणि नाट्य यांची अंगभूत आवड, शेक्सपिअरप्रेम हा त्यांना गडकरी आणि शिरवाडकर यांच्यातील समान धागा वाटतो. तो लक्षात घेऊन गोमंनी 'दुसरा पेशवा' या नाटकाची पाहणी केली आहे. बाजीरावाच्या व्यक्तिरेखेतून शिरवाडकरांनी कविवृत्तीच्या आदर्श प्रेमिकाचे चित्रण केले आहे, असे त्यांना वाटते. किंबहुना बाजीरावाच्या व्यक्तिमत्त्वातील प्रेम आणि पराक्रम या विशेषांचे आविष्करण करावे या उद्देशाने शिरवाडकरांनी हे लेखन केले असावे, असे गोमंचे प्रतिपादन आहे. गो. म. कुलकर्णींनी कुसुमाग्रजांच्या 'स्वप्नाची समाप्ती' या कवितेचा संदर्भ दिला आहे. "ध्येय, प्रेम, आशा यांची होतसे का कधी पूर्ती?" हा व्याकूळ करणारा प्रश्न दोन्हीकडेही समानच आहे, असे ते म्हणतात.[६] प्रेम आणि पराक्रम या भव्य विषयांच्या जोडीने प्रेम आणि मरणाचा दिव्य आशयही या नाटकात सामावला आहे, असा 'दुसरा पेशवा' या नाटकाचा गौरवही त्यांनी केला आहे. ऐतिहासिक नाटकाचे पुनरुज्जीवन म्हणून गो. म. कुलकर्णींना 'दुसरा पेशवा' हे नाटक महत्त्वाचे वाटते. जुन्याचे सामर्थ्य नव्याने न्याहाळून पाहण्याचा एक सच्चा प्रयत्न म्हणून गो. म. कुलकर्णी 'दुसरा पेशवा' या नाटकाकडे पाहतात.

'नाटककार विजय तेंडुलकर : एक जिंकणे-हरणे' हा मराठी नाट्यसृष्टी या ग्रंथातील पंचेचाळीस पृष्ठांचा दीर्घ लेख आहे. केवळ तेंडुलकरांच्याच अभ्यासकांना नव्हे, तर एकूणच मराठी नाट्याभ्यासकांना अत्यंत उपयुक्त ठरणारा हा लेख आहे. एका महत्त्वाच्या नाटककाराच्या बव्हंशी नाट्यकृतींचा त्यात सखोल परामर्श आहे. तेंडुलकरांच्या बऱ्याच नाट्यसंहिता तपासून त्यांच्या नाट्यलेखनाचा आलेख गो. म. कुलकर्णींनी मांडला असून त्यांच्या नाट्यकृतींची परखड चिकित्सा केली आहे. एक नाटककार म्हणून त्यांचे असलेले खास विशेष गोमंनी प्रारंभीच नोंदविले आहेत. "नाट्यमाध्यमासंबंधीची त्यांची इमानदारी, या माध्यमाच्या इभ्रतीची त्यांची जपणूक, ते शक्यतो शुचिर्भूत ठेवण्याची त्यांची धडपड हे माध्यम आपल्या परीने अधिकाधिक लवचीक बनविण्याचा त्यांचा साक्षेपी प्रयत्न मराठी नाट्यसृष्टीत तरी दुर्मीळ आहे",[७] असा गोमंनी तेंडुलकरांचा गौरव केला आहे.

गिधाडे, अशी पाखरे येती, शांतता कोर्ट चालू आहे, सखाराम बाइंडर आणि घाशीराम कोतवाल या तेंडुलकरांच्या गाजलेल्या व त्यांना जागतिक कीर्ती मिळवून देणाऱ्या नाटकांवरील गो. म. कुलकर्णी यांचे अभिप्राय लक्षात घेण्यासारखे आहेत. 'गिधाडे' नाटकातील इतर कोणत्याही घटकापेक्षा त्यातील भीषणभाव अधिक प्रभावी ठरतो, त्याचे चिंतनशीलतेत परिवर्तन होत नाही, असे गो. म. कुलकर्णींना वाटते. 'गिधाडे' या नाटकाच्या पार्श्वभूमीवर 'अशी पाखरे येती' ही नाट्यकृती त्यांना कोमलकांत पदावलीने उमटून वेगळी दिसणारी वाटते.

'शांतता, कोर्ट चालू आहे' या नाटकाच्या संदर्भात गो. म. कुलकर्णी यांनी मत नोंदविले आहे की, वास्तववादी म्हटली जाणारी मराठी नाटके तेवढी वास्तववादी नसतात, ही वस्तुस्थिती लक्षात घेता तेंडुलकरांचे हे अविकृत वास्तवदर्शन अधिकच मोलाचे ठरते.[८] प्रक्षोभक घटनांच्या प्राचुर्यामुळे 'सखाराम बाइंडर' या नाटकात व्यक्तिदर्शन प्रभावी होत नाही, आणि नाटक शोकान्तिकेची अपेक्षित उंची गाठत नाही, अशी गो. म. कुलकर्णी यांची मीमांसा आहे. 'घाशीराम कोतवाल' या नाटकाचा अन्वय लावताना गो. म. कुलकर्णी म्हणतात की, सत्ताधाऱ्यांचे अधःपतन, समाजजीवनाचा ऱ्हास, राक्षसांचा जन्म, त्या जन्मकर्मातील नियतीचा हात, तिचा सनातन चक्रनेमिक्रम या साऱ्यांचा पट उलगडून दाखविण्याचा हा प्रकार अपेक्षित कलात्मक बलवत्ता व संपन्नता प्राप्त करू शकलेला नाही.[९] विद्याधर पुंडलिक आणि आनंद यादव यांना दिलेल्या एका मुलाखतीत याची अधिक मीमांसा गो. म. कुलकर्णी







यांनी केली आहे.[१०] तेंडुलकरांचे नाट्यलेखन केवळ प्रयोगनिष्ठ नाही. त्यात साहित्यिक मालमसाला भरपूर आहे. किंबहुना तो ज्या वेळी यथायोग्य असतो, त्या वेळीच त्याचे प्रयोगमूल्यही वाढलेले आढळते. म्हणून गो. म. कुलकर्णींना असे वाटते की, 'घाशीराम' साहित्य दृष्ट्या कच्चे राहिले नसते, तर प्रयोग दृष्ट्याही ते अधिक वरच्या पातळीवर गेले असते.

तेंडुलकरांच्या नाटकांनी मराठी रंगभूमी साक्षेपशील बनली. तेंडुलकरांनी मराठी रंगभूमीला वास्तवाचे अधिष्ठान मिळवून दिले. त्यांनी उपेक्षित व्यक्तींच्या जीवनातील हर्षशोक उलगडून दाखविले. नाट्यभाषेच्या उपयोजनात बोलीभाषेतील व्यंजनसामर्थ्यावर भर दिला. असे श्रेय तेंडुलकरांना देऊनही गो. म. कुलकर्णी यांनी त्यांच्या नाटकांच्या संदर्भात काही प्रश्न उपस्थित केले आहेत, आणि खंतही व्यक्त केली आहे. तेंडुलकरांच्या पात्रांच्या विचारांची वावडी निराशेच्या एकाच दिशेने भ्रमत राहते, तेंडुलकरांची सारीच पात्रे जिंकण्यापेक्षा हरण्याचीच घोषणा करतात. गो. म. कुलकर्णी विचारतात, तेंडुलकर आपल्या नाटकांचा परिघ एवढा निरुंद का ठेवतात? ठरावीक पद्धतीचाच जीवनाशय ते पुनःपुन्हा घोळवीत-घुसळीत का राहतात? त्यांची जीवनदृष्टी पृष्ठभागावरच का तरंगते? तीतून जीवनाच्या गाभ्याला, गूढाला जाऊन मिळणारी सूक्ष्म, सूक्ष्मतर वलये का निर्माण होत नाहीत? यांसारख्या प्रश्नांची उत्तरे तेंडुलकरांच्या उद्याच्या नाट्यनिर्मितीत गवसतील, असा आशावादही त्यांनी प्रकट केला आहे. गो. म. कुलकर्णी यांनी उपस्थित केलेले प्रश्न तेंडुलकरांच्या अभ्यासकांना विचारप्रवृत्त करणारे आहेत.

दलित रंगभूमीचा सविस्तर विचार गो. म. कुलकर्णींनी केला आहे. तत्कालीन दलित रंगभूमीचे वास्तव स्वरूप मांडून या रंगभूमीसमोरील समस्यांचा त्यांनी आस्थापूर्वक विचार केला आहे. आपल्या लेखात त्यांनी दलित रंगभूमीच्या उज्ज्वल भविष्यासाठी काही उपायही सुचविले आहेत.

दलित साहित्यचळवळीचा एक नवा आविष्कार या दृष्टीने त्यांनी दलित रंगभूमीचे स्वरूपवर्णन केले आहे. दलित रंगभूमी गो. म. कुलकर्णी यांना आशय दृष्ट्या ग्रामीण परिसराशी, जीवनव्यवहाराशी अनुबंधित पण आविष्कार दृष्ट्या शहरी रंगमंचाशी संबंधित वाटते. शोकात्मता, समस्याप्रधानता, समूहप्रधानता, दलित जीवनजाणिवांना आवाहन ही दलित रंगभूमीची वैशिष्ट्ये पाहता प्रस्थापित रंगभूमीशी तिचे नाते अधिक प्रमाणात विसंवादीच आहे, असे गो. म. कुलकर्णी म्हणतात. व्यक्तिनिष्ठेला महत्त्व देणारी, विचारनाट्याचा अभाव असलेली आणि जीवनदर्शनाची मर्यादित क्षमता असलेली प्रस्थापित रंगभूमी दलित रंगभूमीला फारशी उपयुक्त नाही, असे गो. म. कुलकर्णींना वाटते. दलित रंगभूमीने आपला प्रेक्षकवर्ग ठरविण्याची त्यांना आवश्यकता वाटते; कारण या बाबतीतील वस्तुस्थिती त्यांनी लक्षात आणून दिली आहे; ती म्हणजे शहरी सुशिक्षित मध्यमवर्ग हाच दलित रंगभूमीचा प्रेक्षकवर्ग आहे.

दलित रंगभूमीच्या उणिवा पाहताना एक कलाकृती म्हणून दलित नाटकाचे प्रत्यंतर येत नाही, ही त्यांना महत्त्वाची उणीव वाटते. दलित जीवनातील अणि मनातील आंदोलननाट्य प्रत्ययपूर्णपणे पकडले जात नाही, अशी खंत ते व्यक्त करतात. परिवर्तनजन्य संस्कार करण्याच्या दृष्टीने दलित रंगभूमी काय करू शकेल, हे दलित रंगभूमीच्या प्रवर्तकांनी पाहिले पाहिजे, असे गो. म. कुलकर्णी सुचवितात. दलित रंगभूमीने दलितांच्या प्रश्नाबरोबर रंगभूमी या माध्यमाचा सांगोपांग विचार केला पाहिजे. अखेर दलित रंगभूमी आपले वेगळेपण जपत असली, तरी ती मराठी साहित्याचे व संस्कृतीचे एक अविभाज्य अंग असले पाहिजे, असे गो. भ. कुलकर्णी आवर्जून सांगतात.

'मराठी नाट्यसृष्टी' या ग्रंथाच्या परिशिष्टात गो. म. कुलकर्णी यांनी मराठी रंगभूमीच्या अभ्यासाच्या काही दिशा सुचविल्या आहेत. मराठी रंगभूमीचा उषःकाल (डॉ. मु. श्री. कानडे), मराठी रंगभूमीवरील नेपथ्य (पु. श्री. काळे) आणि मराठी नाट्यसमीक्षा (डॉ. रा. शं. वाळिंबे) या तीन ग्रंथांच्या संदर्भात या अभ्यासाच्या दिशा सूचित केल्या आहेत. मराठी रंगभूमीवरील नेपथ्याची शास्त्रशुद्ध चर्चा झाली पाहिजे, असे त्यांना वाटते. तसेच, मराठी रंगभूमीच्या जडणघडणीत पारशी रंगभूमीचा वाटा कसा आहे, याचा मागोवा घेण्याची आवश्यकता त्यांना वाटते. मराठी रंगभूमीच्या संदर्भातील काही दुर्मीळ ग्रंथांचे

व रंगभूमीसारख्या मासिकाचे पुनर्मुद्रण होणेही आवश्यक आहे, असे गो. म. कुलकर्णी सुचवितात.

मराठी रंगभूमीवरील महत्त्वाचे नाटककार, त्यांच्या नाटकांतून प्रकट होणाऱ्या नव्या जाणिवा, प्रवृत्ती या साऱ्या गोष्टींचा धांडोळा गो. म. कुलकर्णी यांनी तत्त्वार्थदर्शिनी बुद्धीने घेतला आहे. त्यांच्या नाट्यसमीक्षेतून प्रकट होतात ते तत्त्वचिंतक गो. म. कुलकर्णी. मराठी नाट्याभ्यासकांना त्यांची नाट्यसमीक्षा विचार प्रवृत्त करते. अभ्यासाच्या विविध दिशा दाखविते.

**संदर्भ :**

१) र. बा. मंचरकर, गो. म. कुलकर्णी यांची समीक्षा, वाई, १९९०, पुरवणी, पृ. १३६.

२) गो. म. कुलकर्णी, मराठी नाट्यसृष्टी, पुणे. १९९३, पृ. ४५.

३) तत्रैव, पृ. ५२.

४) तत्रैव, पृ. ३९.

५) श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे १७।११।१९२३ चे अप्रकाशित पत्र, के. वा. साठे यांना.

६) गो. म. कुलकर्णी. उनि, पृ. ८२.

७) तत्रैव, पृ. १०८.

८) तत्रैव, पृ. १२८.

९) तत्रैव, पृ. १४५.

१०) र. बा. मंचरकर, उनि. पृ. १२७.

११) गो. म. कुलकर्णी, उनि. पृ. १३०.












पुस्तकपरीक्षण :

## ग्रामीण बोलीचा शब्दकोश

माधव पुटवाड

प्रा. डॉ. द. ता. भोसले यांनी त्यांच्या काळातील भाषा आणि लोकसंस्कृतीच्या विविधांगी रंगरूपाची अक्षरनोंद केली आहे. वैविध्यपूर्ण जीवनकाळाची अक्षरनोंद केली आहे. त्यांनी संस्कृतीच्या पाऊलखुणा, चावडीवरचा दिवा, लोकसंस्कृती : स्वरूप आणि विशेष, लोकजीवन आणि लोकसंस्कृती, लोकसंस्कृती : बंध-अनुबंध, ग्रामीण बोलीचा शब्दकोश (मेहता पब्लिकेशन), ग्रामीण बोलीचा शब्दकोश (ग्रंथाली प्रकाशन), पार आणि शिवार, बाळमुठीतील दिवस, परिघावरची माणसे अशा अनेक पुस्तकांतून केलेली ही नोंद अभ्यासकांसाठी, इतिहासलेखकांसाठी खूप महत्त्वाची ठरणार आहे.

येथे मी प्रामुख्याने त्यांच्या ग्रामीण बोलीचा शब्दकोश (ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, प्रथम आवृत्ती २०१४) या कोशाच्या अनुषंगाने लिहीत आहे.

ज्या काळात मराठी भाषेतील अनेक शब्द आणि त्या शब्दांच्या अर्थापाठीमागील संदर्भ मराठी भाषकांनाही अपरिचित होत आहेत, अशा या काळात प्रा. डॉ. द. ता. भोसले यांनी हा कोश निर्माण करून त्या शब्दांचा आणि त्या शब्दांच्या अर्थापाठीमागील विविध संदर्भांचा परिचय करून दिला आहे.आजच हे शब्द आपणास अपरिचित वाटताहेत; तेव्हा येणाऱ्या काळात या शब्दांचे काय होईल हा प्रश्नच आहे. आपण जर या शब्दांची वेळीच नोंद केली नाही, तर आपल्या भाषेचा हा समृद्ध भाषिक इतिहास पुढच्या पिढीला कसा कळेल?

आता आपला सगळा व्यवहार रुपयात होत आहे. आपण शंभर-पाचशे-हजार-लाख अशी भाषा बोलताहोत. आता आपण एक पैसा-दोन पैसे-तीन पैसे-पाच पैसे असे बोलत नाही. या स्वरूपाचा व्यवहारही करत नाही. पंचवीस पैशाचे नाणेही आज चलनात राहिले नाही. भविष्यात एक हजार रुपयांची नोट वापरात येईल, असे पन्नास वर्षांपूर्वीच्या माणसाला स्वप्नही पडले नसेल; मात्र सध्या पाचशे-हजार रुपयांच्या नोटा ही सामान्य बाब झाली आहे. माणसे हजार-लाखांच्या भाषेत बोलताहेत. अशा काळात एका आण्याच्या अर्ध्या भागासाठी वापरला गेलेला 'अडका' शब्द कोणाला कळेल का!

सध्या 'डायनिंग टेबल' संस्कृती बऱ्यापैकी रुजत आहे. आता पाटावर बसणे आणि पुढे ताट ठेवण्यासाठी चौरंग वापरणे या गोष्टी खूप मागे पडल्या आहेत, तेव्हा आता त्या चौरंगाला 'अडणी' म्हटले जायचे, हे सगळे कोणीतरी सांगितल्याशिवाय, लिहून ठेवल्याशिवाय कळणार आहे का? आता धान्य वा इतर पदार्थ किलोग्रॅममध्ये मोजण्याची पद्धती रूढ होतीये. चिवटाक-नवटाक-पावशेर-आस्तेर-शेर-आदली-पायली-मण-खंडी हे सगळे शब्द कालबाह्य होताहेत. आता अडीच शेराच्या मापाला 'अडशेरी' म्हणतात, हे तरी कसे कळणार आहे?

आता स्त्रियांचे बाळंतपण दवाखान्यात होत आहे. रीतसर प्रशिक्षण घेतलेले डॉक्टर हे काम करत आहेत. तेव्हा अशा या काळात आपण जर कधीकाळी औपचारिक प्रशिक्षण न घेतलेली एखादी स्त्री गावातल्या स्त्रियांचे बाळंतपण करत असे सांगितले, तर ते आज कोणाला पटणार आहे का! आणि मग अशा स्त्रियांना 'दाई' म्हणत असत, हे तरी त्यांना कसे कळावे! अंबोण, ओचा, दावण, धुवाडी, [illegible], बोहले, मेणा, कंदुरी, गोधडी, घुसळखांब, घो[illegible] अशा कितीतरी शब्दांबद्दल असेच म्हणता येईल. या [illegible] काळ, त्यांची संस्कृतीच आता काळाच्या पड[illegible] जात आहे आणि म्हणून आता ना हे शब्द वा[illegible]ले आहेत, ना या शब्दांचे अर्थ कोणाला कळ[illegible] शब्दांच्या अर्थापाठीमागील संदर्भ तर सांगूनही लक्षात घेत नाहीत. मात्र हे शब्द आणि या शब्दांची संस्कृती या बाबी ज्यांच्या

अनुक्रमणिका

जीवनव्यवहाराच्या अविभाज्य भाग होत्या, त्या डॉ. द. ता. भोसले यांनी विविध अर्थच्छटांसह त्या शब्दांपाठीमागील संस्कृतीला शब्दरूप दिले आहे.

थोडक्यात म्हणजे या शब्दांशी संबंधित वस्तू, वास्तू, पदार्थ, कल्पना, दैनंदिन व्यवहार अशा बाबी बऱ्यापैकी इतिहासजमा होताहेत आणि म्हणून हे शब्द, या शब्दांनी सूचित विविध अर्थ, त्या अर्थांपाठीमागील विविध संदर्भ, वस्तू, वास्तू, पदार्थ, कल्पना, दैनंदिन व्यवहार आता नव्या पिढीला समजणे अवघड आहे. या अशा शब्दांची आपण वेळीच नोंद केली नाही, तर त्या त्या वस्तू, वास्तू, पदार्थ, साधने, जीवनपद्धती इत्यादींच्या काळाच्या पडद्याआड जाण्याबरोबरच आपल्या भाषेतील विविध अर्थच्छटा असणारे हे हजारो शब्दही काळाच्या पडद्याआड जातील. हे अर्थक्षम शब्द पुढच्या पिढीच्या वाचनात आले, तर त्यांना त्यांचा नेमका अर्थ कळणार नाही. परिणामी, ते या शब्दांचा चुकीचा अर्थ लावतील किंवा हे शब्दच निरर्थक ठरवतील. कदाचित पुढील पिढी हे शब्द आपल्याच भाषेतून वगळून टाकतील. आपल्याच भाषेला दरिद्री बनवतील.

आपल्या भाषेत इतर कोणत्याही भाषेतील शब्द समाविष्ट होणे, ते लोकांच्या बोलण्यात येणे आणि त्यामुळे लोकांतील व्यवहार नि संवाद अधिक सुकर होणे, यात वाईट काहीच नाही. उलट, अशातूनच आपली भाषा समृद्ध होईल. ती बदलत्या काळात आपल्या गरजा पूर्ण करत राहील. टिकून राहील. पण मुळात आपल्या भाषेत असणारे अर्थक्षम शब्द आपल्या भाषेतून नाहीसे होणे, ही बाब मात्र वाईटच. भाषेच्या दृष्टीने विघातकच म्हणायला हवी. अशातून आपली भाषा तिचे समृद्ध मूळरूप हरवून बसेल. तेव्हा ज्यांना असे होऊ नये असे वाटते, त्यांनी आपल्या काळातील प्रचलित शब्द त्यांच्या विविध अर्थांसह, वेगवेगळ्या संदर्भांसह नोंदवले पाहिजेत. हे काम ज्यांनीत्यांनी आपापल्या परीने करणे महत्त्वाचे ठरणार आहे. प्रा. डॉ. द. ता. भोसले यांनी या कोशाच्या माध्यमातून ते महत्त्वाचे काम केले आहे.

आता माणसे आपला गाव, आपला परिसर, आपली भाषा, आपली माणसे, आपले प्रश्न, आपले जगणे यांविषयी कमी बोलताहेत आणि तिकडच्या दिल्ली-मुंबईच्या राजकारणाविषयी आणि राजकारण्यांविषयी जास्त बोलताहेत. इतर भाषा, संस्कृतीविषयी बोलताहेत. इतरांच्या श्रीमंतीविषयी बोलताहेत. राजकारण्यांच्या आणि श्रीमंतांच्या मुलांमुलींविषयी बोलताहेत. त्यांच्या भानगडींविषयी बोलताहेत. अर्थात, जेव्हा इतर भाषा-संस्कृती वा इतर घटकांचा माणसांना परिचय होतो, तेव्हा माणसे या नव्याने परिचित झालेल्या घटकांविषयी बोलणारच. त्यांचे ते वर्तन सहज आहे.

सध्या प्रसारमाध्यमांच्या द्वारे नव्या संस्कृतीचा परिचय होत आहे. नव्या जगाचा परिचय होत आहे. त्याविषयीही ते बोलणारच. टी. व्ही.वरील मालिकांचा आणि जाहिरातींचा मानवी जीवनावरील प्रभाव अशाच स्वरूपाचा नव्हे काय? पण आपल्या या अशा वर्तनातून आपले जगणे आपणच दुर्लक्षित करत आहोत. आपल्याच बोलीभाषेला आपण टाळत आहोत, हेही लक्षात घेतले पाहिजे. आपले हे असे वर्तन समर्थनीय ठरत नाही. शिवाय आपण आपली विचारशक्ती हरवून बसत आहोत. योग्य-अयोग्य काय याची चिकित्सा न करणे नि आपणास न परवडणाऱ्या मालिकांच्या नि जाहिरातींच्या प्रभावात जगणे चांगले कसे म्हणता येईल? विवेकशून्य जगणे कोणत्याही काळातल्या माणसांसाठी चांगले नव्हे! कधीकाळी रांगडी असणारी मराठी बोलीभाषा, थेट अर्थ व्यक्त करणारी मराठी बोलीभाषा, शिव्याही सहजपणे व्यक्त करणारी मराठी बोलीभाषा, अनेकार्थक्षम मराठी बोलीभाषा तिच्यातले हे सामर्थ्यच हरवून बसत आहे. आपण उगीच भाषेच्या शुद्धतेचा अहंकार मात्र जपायला लागलो आहोत. दैनंदिन व्यवहारात बऱ्यापैकी बोलीभाषेचा वापर टाळत आहोत. हिन्दी-इंग्रजी शब्दांचा वापर करत आहेत. आता शिव्या ऐकायला मिळत नाहीत. म्हणी ऐकायला मिळत नाहीत. वाक्प्रचार ऐकायला मिळत नाहीत. उखाणे कोणी घेत नाहीत. पूर्वीसारख्या कोणी शिव्या दिल्या, म्हणी-वाक्प्रचार-उखाण्याच्या भाषेत बोलले, तर लोक अशा माणसांकडे विचित्र नजरेने पाहत आहेत. शिव्या देणाऱ्यांना असंस्कृत ठरवताहेत. तेव्हा अशा या काळात इब्लिस, इलुसा/उलिसा, इंगळ, इळभर, वेसवा, सटवी अशा शब्दांच्या विविध अर्थच्छटा पुढच्या पिढीला कळतील का? प्रा. डॉ. द. ता. भोसले यांनी मोठ्या आत्मीयतेने






व कष्टाने मराठीच्या या बोलीरूपांची नोंद केली आहे. त्या त्या शब्दांच्या विविध अर्थच्छटा उदाहरणांसह नोंदवल्या आहेत. अनेक ठिकाणी रेखाटने दिली आहेत. भोसलेसरांचे हे काम अत्यंत महत्त्वाचे आहे. आपल्या भाषेचे समृद्ध रूप नोंदवणारे आहे. हा कोश नक्कीच एवढा महत्त्वाचा आहे की, तो प्रत्येकाने आपल्या संग्रही ठेवायला हवा.

ग्रामीण बोलीचा शब्दकोश,
डॉ. द. ता. भोसले,
ग्रंथाली प्रकाशन, मुंबई १६,
पहिली आवृत्ती २०१४,
पृ. १९०, मूल्य २०० रु.

ØØØ

## वाचकांचा पत्रव्यवहार

स्मिता लाळे
डी/३०१, वसुधा,
डी. एस. के. विश्व, धायरी,
पुणे - ४११०४१

श्री. संपादक,
नवभारत मासिक यांस,
स. न. वि. वि.

घुमानच्या साहित्य संमेलनाविषयी अनेक ठिकाणी लिहिले गेले आहे. परंतु पुण्यापासून घुमानपर्यंतचा प्रवास अनेक अडचणी असतानाहो किती आनंददायक झाला, ते सांगणे गरजेचे आहे. इथून पुढे त्या प्रवासाचे व स्वयंसेवकांच्या कष्टाचे वर्णन देत आहे. अखेर ५ एप्रिलला संमेलनाचा समारोप झाला आणि घुमानवारीचे वारकरी ८ तारखेला पुण्यात पोचले. पुण्यात पोचल्यावर इतक्या दिवसांची वर्तमानपत्रं वाचली. बातम्या वाचल्या– 'गाडीमध्ये प्रवाशांचे हाल झाले, त्यांना नाश्ता–पाणी नीट मिळाले नाही, त्यात दोनजणांचा मृत्यू!' मनात आलं, या बातम्या वाचून इथे असणाऱ्या घरच्या माणसांना किती काळजी वाटली असेल! आपण वाचलेल्या बातम्या खऱ्या आहेत का?

घुमानहून घरी आल्यावर या बातम्या वाचून मला वेगळ्याच कारणासाठी वाईट वाटलं! परिस्थिती जाणून न घेता अर्धवट माहितीच्या आधारे दिलेल्या या बातम्या. सचिन, हृषिकेश, कोमल, शर्वरी, संकेत या आणि इतर कार्यकर्त्यांचे चेहरे समोर आले. त्यांनी घेतलेली मेहनत, आपुलकीने केलेली विचारपूस, मदत हेच सर्व आठवत राहिलं; अजूनही आठवतंय. साठी ओलांडलेले बहुतेक प्रवासी. त्यांना त्रास होतोय, ऊन आहे, भूक लागली आहे, कुणाला बिनसाखरेचा चहा हवाय, तर कुणाला नुसतंच दूध हवंय. या सर्वांच्या मागण्या पूर्ण करायच्या, त्यांना हवं-नको बघायचं– मला उन्हामुळे जेवण नकोसं झालंय–इथे प्लॅटफॉर्मवर स्टॉल दिसतोय–तिथे कोल्ड्रिंक आहे–पण कोण आणणार? जाऊ का? अर्धा तास झाला गाडी इथेच थांबली आहे, पण नेमकी सुटली तर? तेवढ्यात कुणीतरी प्लॅटफॉर्मवरून उडी मारून, रेल्वे लाइन क्रॉस करून, समोरच्या स्टॉलमधून लिम्का आणला. त्या धडपडीत त्याच्या पायाला लागलेलं दिसतंय. 'मॅडम, तुम्हाला जेवण जात नाहीये ना? हे घ्या, बरं वाटेल ...' असं म्हणणारा सचिन आठवला. पण या गोष्टीची बातमी नाही झाली. माइक आणि कॅमेरा घेऊन हिंडणाऱ्यांचं कुठे होतं इकडे लक्ष? अरे, कोण होतो आम्ही त्यांचे? आम्ही फक्त सहप्रवासी होतो आणि हे कार्यकर्ते –माणुसकी, आपुलकी जपणारे. कदाचित झालेही असतील कुणाचे हाल, तब्बेत बिघडलीही असेल; पण त्याची 'अशी' बातमी होणंही योग्य नाही ना? नाही, नाही. हे कळायलाच पाहिजे वाचकांना. साहित्यसंमेलनाच्या मंडपातलं अध्यक्षीय भाषण, परिसंवाद टी. व्ही. वर, पेपरमध्ये सतत लोकांसमोर येत होते, दिसत होते; पण हे

पडद्यामागलं कोण सांगणार? माझी जबाबदारी आहे ते सांगण्याची. मला सांगायलाच पाहिजे; मला लिहायलाच पाहिजे.

मुंबईहून गाडी सुटली. पहाटे ५ वाजता येणारी गाडी थांबत थांबत सकाळी १० वाजता पुण्याला पोचली. आत्ता गाडी लेट झाली, तरी पुढे ती टाइम मेकअप करेलच, अशी प्रत्येकाला आशा होती. आपले सहप्रवासी कोण आणि कसे आहेत, हे आधी कधीच कळत नाही; पण या वेळी मात्र, आपल्या शेजारी बसलेला रसिक तरी नक्कीच आहे; साहित्यिक असेल तर दुधात साखर! आख्खी गाडीच अशा समानधर्मींची! ही कल्पनाच छान वाटली!

हळूहळू शेजारच्यांशी ओळखी व्हायला लागल्या. आपापल्या कोषातून बाहेर पडायला लागले होते सगळे. शेजारी अनिल घाणेकर बसले होते. साहित्यिक नव्हते. ऑर्गनायझर होते. कार्यकर्त्यांची टीम घेऊन चालले होते. हे अनिल घाणेकर पुण्याचे. सत्तरीच्या जवळपास. पुणे विद्यार्थिगृहाचे संचालक. त्यामुळे पुष्कळ तरुणांशी ओळख. त्या सर्वांचे हे सर! त्यामुळे घुमानवारीला त्यांनी या वारकऱ्यांना बरोबर घेतलं होतं. हे सगळे आदल्या दिवशी-३१ मार्चलाच-पुण्याहून मुंबईला गेले होते. गाडी यांनीच तर ताब्यात घेतली होती. झालं होतं काय की, रेल्वेनं फक्त डबे दिले होते. ते डबे जोडून घेणे, पॅंट्री कारची व्यवस्था करणे वगैरे त्यांची काहीच कामे रेल्वे खात्याने केलेली नव्हती. संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारी होती. ३१ तारखेला दुपारी २ वाजता पोचलेली ही मंडळी रात्री २ वाजेपर्यंत अथक मेहनत घेत होती. रेल्वे ट्रॅकमधून अंधारात धडपडत होती. ठेचकाळत होती. कित्येकांना दुखापत झाली. ट्रॅकमधलं वाढलेलं गवत, खाचखळगे या सर्वांतून मार्ग काढत त्यांनी गाडी तयार केली. तब्बल अठरा डबे जोडून घेतले. आश्चर्य म्हणजे गाडीत पाणी भरणं, इलेक्ट्रिक/लाइटची व्यवस्था बघणं, डब्यांची स्वच्छता करणं, प्रोव्हिजन भरणं या सगळ्या गोष्टी कार्यकर्त्यांनी केल्या. केटरिंग होतं पण तेही रेल्वेचं नव्हतं; खासगी कंपनी-अन्नपूर्णाचं होतं. त्यांचीही मुलं रात्रभर अक्षरशः खपत होती.

बरं, ही मुलं कुणी अशीतशी नव्हती; चांगल्या घरांतली, शिकलेली होती. कुणी प्राध्यापक होतं, कुणी एम. बी. ए. करत होतं, कुणी मराठी घेऊन एम. ए. करत होतं. फक्त एकाच गोष्टीनं या सगळ्यांना खेचून आणलं होतं: साहित्य. त्यांना ओढ होती साहित्याची! साहित्यिकांना भेटायचं होतं. जमलंच तर त्यांच्याशी बोलायचं होतं, त्यांच्या कविता त्यांच्याच मुखातून ऐकायच्या होत्या. मुलाखती घ्यायच्या होत्या. बरं, ३१ ला दुपारी मुंबईला जाऊन आपल्याला हे सगळं करावं लागेल याची कल्पनाही नव्हती यांना; पण घरच्या कार्यात नाही का कधीकधी आणीबाणी उद्भवते आणि मग सगळ्यांनाच कंबर कसावी लागते. तशीच ही मंडळी राबली होती. गाडीनं पुणं सोडलं तरी यांचं काम संपलं नव्हतंच. पुण्यात चढलेल्यांना नाश्ता-पाणी, जेवण हे सर्व मिळालं की नाही, कुणी 'असंच' नाही ना घुसलं गाडीत, हे बघणं ही कामं होतीच!

गाडी आपली मजल दरमजल करीत, कुठे अर्धा तास, कुठे एक तास तर कुठे दोन तास विश्रांती घेत तिच्या मर्जीनुसार चालली होती. पण इथे कुणाला त्याची फिकीर? गाडी सायडिंगला पडण्याचा प्रकार सगळ्यांच्याच लक्षात आला होता, गळी उतरला होता. तो उतरवून घ्यावाच लागला. कुठवर रडत बसणार? वैतागणार? एवढा निवांत वेळ मिळाला आहे. त्याचं सोनं करायचं आपल्या हातात आहे. आपल्या ओंजळीत पडलेल्या या क्षणांना मुठीत पकडायचं आहे. दुपारच्या झळा, मनाची तगमग दुपारच्या विश्रांतीनं थोडी शांतवली. सूर्य कलला आणि मग जिथेतिथं कवितावाचन, पुस्तकवाचन सुरू झालं. गप्पा रंगल्या. त्यातून ओळखी निघाल्या. अरे! चक्क 'स्थळांची' देवाणघेवाणही झाली. पत्ते, गाण्यांच्या भेंड्या, शब्दकोडी सोडवणं. हो, या कार्यकर्त्यांनी शब्दकोडीही बरोबर आणली होती. एकूण, आपल्या शेजारचा माणूस साहित्यिक असेल-नसेल, निदान रसिक तरी आहेच. सगळेच सुखावले. वातावरणात उत्साह निर्माण झाला.

छोटे छोटे ग्रुप जमले. छोटी छोटी कविसंमेलनं सजू लागली आणि व्हॉलेंटिअर्सची पावलं तिथेच रेंगाळू लागली. जोशीकाकांचा मोबाइल चार्जिंगला ठेवायला जाताना कानावर कविता पडली की ती पूर्ण ऐकून, दाद देऊनच ते पुढे सरकू लागले. अशा व्हॉलेंटिअर्सपैकी एक कवी- पाटील. त्यांनीही आपली कविता जाता जाता ऐकवली. काहींनी सुरेश भट, नारायण सुर्वे, कुसुमाग्रज, गदिमा यांच्या कविताही ऐकवल्या. कवी उद्धव कानडे यांना तर तशा उन्हातही नवीन कविता सुचली. ती ताजी ताजी कविता लगेच ऐकवलीही! निर्मितीचा क्षण कवींना कुठे, कसा गवसेल, हे सांगता येत नाही. त्यांनी ऐकवलेली 'आई' वरची कविता, तर पाटील यांनी ऐकवलेली 'मुली'वरची कविता या कवितांनी डॉक्टरांच्या डोळ्यांतून पाणी काढलं. हो, आमची काळजी घेण्यासाठी एक डॉक्टरांची टीम आमच्याबरोबर होती. त्यांनी सेवा देऊन अक्षरशः कमाल केली. एवढ्या लांबच्या प्रवासात, उन्हाळ्यात कुणाच्या तब्बेती बिघडल्या तर? त्यासाठी ही व्यवस्था होती. या डॉक्टरांनी स्वतःबरोबर औषधं, इंजेक्शनं, बी. पी. मशीन, ग्लुकोमीटरपासून ऑक्सिजनच्या सिलिंडरपर्यंत सगळी तयारी आणली होती. मोकळा वेळ मिळाला की, लगेच कुठल्यातरी कविसंमेलनात सहभागी व्हायचे. मग त्यांच्यासाठी एक वेगळं कविसंमेलन सजलं.

गाडी थांबली की, ओव्हनमध्ये बसल्यासारखं वाटायचं, पण अशातही उद्धव कानडेसारख्या एखाद्या कवीला कविता सुचू शकते, ती तो ऐकवतो आणि दादही घेऊन जातो. खरंच, कवीची सृष्टीच वेगळी असते. ब्रह्मदेवाच्या सृष्टीत तो स्वतःची वेगळी सृष्टी निर्माण करतो. स्वतः आनंद घेतो, दुसऱ्यांना देतो; एवढंच नव्हे तर निर्मितिप्रक्रियेत रसिकांना सहभागीही करून घेतो. कारण रसिकांशिवाय कवितेला पूर्णत्वच नाही.

-तर असं सगळं गाडीतलं वातावरण होतं. एन्जॉय करत होतो आम्ही. अखेरीस ३ तारखेला सकाळी ११-१२ वाजेपर्यंत घुमानला पोचलो. तिथेही कार्यकर्त्यांचं आमच्याकडे लक्ष होतंच. त्यांची धावपळ तिथेही होतीच. संमेलनात समारोपप्रसंगी या कार्यकर्त्यांचा प्रातिनिधिक सत्कार केला गेला. जवळजवळ पन्नासएक कार्यकर्ते होते; एवढ्या सगळ्यांना एकदम स्टेजवर बोलावणं केवळ अशक्य होतं. पण त्यांची आठवण ठेवली गेली हे विशेष!

एकूणच 'तो प्रवास सुंदर होता'; तो सुखद कसा करता येईल, हे सर्व प्रवासी व कार्यकर्त्यांनी बघितलं. कुणाला काय म्हणायचं ते म्हणू दे, काहीही बातम्या देऊ दे. ५ तारखेला संमेलनाचा समारोप झाला; येतानाही तोच गोंधळ होता, गाडी तशीच लेट होती, पण तरीही रेल्वे कविसंमेलनं, रेल्वे साहित्यसंमेलनं सजत होती. शुभकार्यानंतरची चर्चा चालू होती-कुणी काय करायला हवं होतं-मंडपात दर्दींची गर्दी दिसली नाही-परिसंवाद छान झाला; मात्र फक्त पंधरा-वीस श्रोते मंडपात होते-मंचावरचा राजकारण्यांचा वावर जरा अतीच होता -यावर उलटसुलट चर्चा रंगली होती. या संमेलनोत्तर संमेलनातल्या परिसंवादात प्रत्येकजण हिरिरीनं भाग घेत होता. खऱ्याखुऱ्या रसिकाचा चेहरा त्यात दिसत होता. याचंही शूटिंग कुणीतरी घ्यायला हवं होतं.

दौंड आल्यावर पुण्याची चाहूल लागली. ही चाहूल घेत दीड तास दौंडमध्येच आम्ही होतो. झोप कुणालाच नव्हती.

सहज एका कंपार्टमेंटमध्ये डोकावून बघितलं. सगळे 'नारायण' आता मात्र बर्थवर गाढ झोपले होते.

ෆෆෆ










## लेखकांचा परिचय

❖ **वाग्वैद्य प्रा. मो. गो. धडफळे**

प्राच्य विद्यांचे व संस्कृत भाषेचे ज्येष्ठ अभ्यासक. प्रसिद्ध भांडारकर संशोधन संस्था, पुणे येथे सभासद म्हणून कार्यरत.

***पत्ता :–*** भांडारकर प्राच्य विद्या संशोधन संस्था, भांडारकर रस्ता, पुणे - ४११ ००४

दूरध्वनी : (०२०) २४२६०४९८.

❖ **डॉ. राजेंद्र गोविंदराव नाईकवाडे**

सी. पी. ॲण्ड बेरार महाविद्यालय, नागपूर येथे मराठीचे प्राध्यापक आहेत.

***पत्ता :–*** ४८, योगायोग, जुना नंदवन परिसर, नागपूर - ४४० ००९.

भ्रमणध्वनी : ९८५०३५१०२५.

❖ **डॉ. माधवी देसाई**

शिक्षणमहर्षी बापूजी साळुंखे महाविद्यालय, कराड येथे वरिष्ठ विभागात प्राध्यापिका. ग्रेस यांची कविता : स्वरूप शोध (संध्याकाळच्या कविता आणि चंद्रमाधवीचे प्रदेश या कवितासंग्रहांच्या अनुषंगाने या विषयावर एम. फिल. पदवी). पु. शि. रेगे आणि ग्रेस यांच्या कवितेतील स्त्री-प्रतिमा या विषयावरील शोधप्रबंध पीएच. डी.साठी सादर. विविध नियतकालिकांतून शोधनिबंध प्रकाशित.

***पत्ता :–*** ४०४, खणभाग, जुने स्टेशन रोड, सांगली - ४१६४१६.

भ्रमणध्वनी : ९३२५०६३६०६.

❖ **प्रा. डॉ. विनायक गंधे**

डी. बी. जे महाविद्यालय, चिपळूण येथे मराठीचे प्राध्यापक व विभागप्रमुख होते. त्यांची 'एकच प्याला : समीक्षापर्व' आणि 'लंपनचे भावविश्व' ही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

***पत्ता :–*** सी. २०१ राधिका सहकारी गृहरचना संस्था, पर्वतीनगर, सिंहगड रोड, पुणे - ३०

भ्रमणध्वनी : ९८५०६३८८२८.

❖ **प्रा. माधव पुटवाड**

राष्ट्रसंत गाडगे महाराज अमरावती विद्यापीठ येथील मराठी विभागात प्राध्यापक.

***पत्ता :–*** १२३, जिजाऊ नगर (गणोरकर ले-आउट), राजुरा नाका, अमरावती.

भ्रमणध्वनी : ९४२३७५०६०२.

❖ **सौ. स्मिता नितीन लाळे**

सायकॉलॉजीतून बी. ए. द. भि. कुलकर्णींवरील गौरवग्रंथ सदरामधून कवितांवरील लेख मागील वर्षांपर्यंत प्रसिद्ध. दिवाळी अंकांतूनही लेख प्रसिद्ध होतात.

***पत्ता :–*** डी/३०१ वसुधा, डी. एस. के. विश्व, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे ४११ ०४१.

भ्रमणध्वनी : ८८०५५६४७३९.

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी के'सागर ग्राफिक्स अ‍ॅण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६७ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी. वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

## लेखकांस आवाहन

*'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.*

*४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

संपादक मंडळ

अनुक्रमणिका





